# श्रियाळचांगुणा सत्वदर्शन

# नाटक.



हें नवीन पुस्तक

रावजी बाळकृष्ण लेले.

यानीं केलें.



तें

नारो आपाजी गोडबोले

यानीं

आपले वृत्तप्रसारक छापखान्यांत छापिले.



मुक्काम पुणें पेठ सदाशिव

ता० १ जून सन १८८२

आवृत्ति ३ री.



किंमत ०६ आणें.

# प्रस्तावना.



श्रीशंकर पदभक्त जो श्रीधर नामाख्य प्रसिद्ध सत्कविवर्य त्यानें शिवलीलामृत, रुक्मिणीस्वयंवर, हरिविजय, रामविजय, पांडवप्रताप इत्याद्यनेक ग्रंथ ओंवीबद्ध रचिले आहेत. त्यांपैकीं शिवलीलामृत ग्रंथांतील चौदाव्या अध्यायांत महाशैवाग्रणी श्रियाळराजा व त्याची स्त्री महासाध्वी चांगुणा यांचें निजसत्व वर्णन केलें आहे, तें वृत्त परमसत्करस असून त्यांत करुणारस प्रधान आहे त्याचा लाभ नाटकग्रंथरूपानें सर्वांस प्राप्त व्हावा एतदर्थ त्याच ग्रंथाच्या आधारानें मी यथामतीनें हें " श्रियाळ-चांगुणा सत्वदर्शन नाटक " या नांवाचा ग्रंथ जनमनरंजन सेवा प्रास्त्यर्थ केला आहे; प्रकृत ग्रंथकर्त्यास असावी तशी कविताशक्ती नाहीं, आणि हा माझा प्रथमच प्रयत्न आहे यास्तव सुज्ञजनांस अशी प्रार्थना आहे कीं,-

## आर्या.

दोषा त्यागुनि घेतिल गुणा कण भावें खरें रसज्ञवर॥
शैवाल[1] टाकुनि निर्मल जल पानानें करीकसा न नर॥१॥

या ग्रंथांतील कवितेंत आलेल्या कठिण शब्दांवर अंक घालून त्याविषयीं खालीं टिपेंत त्याचा अर्थ लिहिला आहे.

---

१ शेवाळें.

# श्रियाळ चांगुणा सत्वदर्शन नाटक.

(प्रकृत ग्रंथकर्त्यानें मंगलाचरण.)

श्लोक (शार्दूल विक्रीडित.)

हेरंबा गणनायका मि नमितों दोहीं करांनीं[1] आधीं॥
भावें येऊनि बुद्धिमांद्य[2] हरिगा दे तोषवृत्ती[3] सुधीं[4] ॥
अंगीं हीं तव आश्रयेंचि सुगुणा तोटा नसावा कधीं॥
कामक्रोध मदादि वैरि मजला गांजीति त्यां तूं वधीं॥१
अंबेचा वचना नसेहि उपमा पूर्णेंदुची[5] साजिरी ॥
ह्मावें[6] नम्र पदीं तिच्या ह्मणुनि तो यांची[7] नखाची सरी॥
सोमाचा[8] वदना कलंक असतो तैसा न तीचा जरा ॥
ऐशा त्या पदसारसा[9] मि नमुनी आनंद मानी खरा॥२

(सूत्रधार प्रवेश करितो.)

मंगलाचरण.

साकी.

श्रीसांबाचा सुत गणेश्वर विघ्नहराया यावें ॥
पुरवा हेतू मन्मनिचा हा शंकर पदयश गावें ॥१॥

(याप्रकारें प्रार्थना होत आहे तों गणपती प्राप्त होतो.)

गणपती:- हे सूत्रधारा, माझ्या आगमनाची किमर्थ इच्छा केलीस तें-मजप्रत निवेदन कर.

सूत्रधार:- हे विघ्ननाशना गणाधीशा, या रंगभूमीवर जनमन रंजनार्थ सत्ज्ञानाचा परम भक्त जो महोदार श्रियाळ राजा व त्याची स्त्री महासती चांगुणा यांचें सत्वदर्शन या नांवाचे नाटकास आरंभ करावयास इच्छितों, तर आपण आशिर्वाद देऊन हें महत्कृत्य निर्विघ्न समाप्तीस-

१ हस्तांनीं. २ जडत्व. ३ समाधानवृत्ती. ४ सुबुद्धी. ५ पूर्णचंद्र. ६ मागें. ७ साम्यता. ८ चंद्राचा. ९ कमल.

पावरावें, असें या दासाचें विनयपूर्वक मागणें आहे.

गणपती- हे नाटकाचार्या, तुझा हा सकळ मनोरथ परिपूर्ण होईल; परंतु नाटक पात्रांच्या अंगीं सज्ञानत्व, प्रौढता, चातुर्य आणि मिष्ट भाषणादिकें करून गुणाचें प्रोत्साहन प्राप्त व्हावें एतदर्थ बुद्धिदात्री जी सरस्वती तीची प्रार्थना करावी आतां मी स्वस्थानाप्रत गमन करितों.

सूत्रधार- बरें आहे, मी आपल्या आज्ञे प्रमाणें करितो. (असें म्हणूने श्रीसरस्वतीचें अत्यादर पूर्वक स्तवन करितो.)

( गणपती गमन करितो. )

साक्या.

त्रिभुवनसुंदरी अनंतशक्ती गायन करिमोर नाचे ॥
सुरनर किन्नर देखुनि अंतरिं तोषित होती साचे ॥१
दंत पंक्तिजणु दिसती मजला दिव्यहिरे खाणीचे ॥
सुगंधतनुची अभंगवरती भेदुन जाइ नभाचे ॥ २
उमटे मुद्रा पदकमलाची तेथें सुवास लोटे ॥
परागरागा हरितोऐसा मन्मनिं कुतुहल वाटे ॥ ३
अनुपम गुणतव गाउनि थकले वद शारदे माते ॥
शक्तिनसेमज भक्तिस्तव दे वरप्रसादा मातें ॥ ४

सरस्वती- (सभास्थानीं नर्तन करीत करीत येऊन) अरे हे सूत्रधारा अत्यादर पूर्वक उच्चस्वरें करून किमर्थ माझें स्तवन करितोस तें सत्वर निवेदन कर.

सूत्रधार- (पुढें येऊन वंदन करून) हे भक्तवत्सले, करुणानिधे, श्रीशारदे या अज्ञानानें श्रियाळ चांगुणा सत्वदर्शन नाटक करावयाचें मनांत आणिलें आहे, या करितां आपण मजसहवर्तमान सर्व नाटक पात्रांचें अज्ञानत्व हरून जनमन रंजनाविषयींची कामना आपले वरप्रसादें करून पूर्ण तेस न्यावी हें दासाचें मागणें आहे.

सरस्वती- हे भारता, तुझीं अज्ञान नाटक पात्रें सज्ञान होऊन माझ्या वरप्रसादें करून वाक्चातुर्यानें तुजप्रत यशस्वी करतील आ-

---

१ देव. २ भंग न पावतां. ३ आकाशाचें. ४ पुष्परस मीतीस. ५ कौतुक. ६ हे सरस्वती.

तां तूं इच्छित कार्यास आरंभ करावा. मी स्वर्गलोकाचे ठायीं स्वस्था-नापत गमन करितें. ( सरस्वती निघून जाते. )

इतक्यांत विदूषक येतो.

विदूषक.- अहाहा स्वामिनः हें काय चाललें आहे, सर्व सभाजन नत-स्थवृत्तीनें आपलेकडे अवलोकन करीत आहेत, मृदंगादिवाद्यें एकसार खीं झडत आहेत. आणि जिकडेतिकडे या रंगभूमीवर हंड्या झुंबरें आ-णि दिव्य दिवे यांचा लखलखाट होऊन राहिला आहे याचें कारण काय? तें सांगाल तर मी हियेथें कांहीं वेळ आपल्यास करमणूक करून घेईन ह्मणजे आपोआप विदुषकावतारानें माहात्म्य या सभास्थानीं आ-पल्या दृष्टीस पडेल.

सूत्रधार.- वाहवा! हीमूर्ती अकस्मात् यासमयीं येथें प्राप्त झाली ही महान् दैवयोगाचीच गोष्ट समजली पाहिजे. विदूषका, आपलें आग-मन झालें येणें करून मम मानसाचे ठायीं परम आल्हाद प्राप्त झाला-आहे बाप्पा तुझीतर अशा प्रसंगीं मला फारच गरज आहे.

विदूषक.- वः काय चमत्कार सांगावा मी कधीं कोणाची गरज बाळ गीत नसतां माझी मात्र तुह्मी गरज आहे असें ह्मणतां त्यास अशी कोणती तरीं गरज तें लवकर गर्जा नाहीं पेक्षां हें ह्मणणें वर्जा.

सूत्रधार.- मारीषा, श्रियाळ चांगुणा सत्वदर्शन नाटक करावयाचें आ-हे, त्यास तुझें उत्तम साह्य असावें.

विदूषक.- वाहावा तें कामतर अस्मादिकांचें, मी यथा शक्ती कोणती ही अटक मनांत न आणितां बे धडक मदत देईन तेणें करून आपण ग-रक होऊन जाल.

सूत्रधार.- बरें तर आतां सत्वर पात्रांची तयारी कर जा.

विदूषक.- ( पांच चार पत्रावळी मांडून ह्मणतो ) ही पात्रांची तयारी केली आहे कोणाच्या उदरीं क्षुधाग्नि प्रज्वलित झाला आहे?

सूत्रधार.- तूं तरी विलक्षणच आहेस तुजकडे कायचूक मींच चु-कलों अरे नाटक पात्रांची तयारी कर जा.

विदूषक.- हँ हा चाललों पहा. ( असें ह्मणून नेपथ्यांत शिरतो. )

## प्रवेश १ ला.

### स्थळ.

कैलास श्री शंकराची सभा.

पात्रें

| | | | |
|---|---|---|---|
| श्री शंकर | कैलासनाथ | कमलनयना | पार्वतीची सखी |
| पार्वती | शंकरपत्नी | नारद | ब्रह्मदेवाचा पुत्र |




( शंकर, पार्वती, कमलनयना, गण इत्यादीक बसले असतां सकल मुनिश्रेष्ठ जो नारद तो प्रवेश करितो. )

नारद - ( श्रीशंकराचें व नारदाचें आगत स्वागत झाल्यावर ) हे विश्वंभरा, भक्तवत्सला, मृत्युलोकाचे ठायीं सहजा वृत्या गमन करीत असतां त्वद्भक्त विशारद असे अनेक भक्त अवलोकन केले; परंतु त्यांत महाशैवाग्रणी असा श्रियाळ राजा व त्याची स्त्री महापतिव्रता चांगु

णा त्यांची नव भक्तींत आसक्ती देखून परमानंद झाला त्या भूमिपाळानें कांहीं वर्णन करितों श्रवण करावें.

श्लोक (शार्दूलविक्रीडित.)

श्रीसांबा धरणीतला वरि असा कांतीपुरी लोकप॥
आहे मानितिज्यास लोक आपुला माता पिता हा नृप॥
श्रीयाळाख्य असे सुशीलसमनचा गंभीर रत्नाकर॥
मोठे भक्त तुझे असोत परि त्यां लागे न याची सर॥१
इच्छाभोजन देइ याचकजना भूपाल तो भक्तिनें॥
वर्षे झालिं दहासहस्र कृतिला त्या त्याचिया कीर्तिनें॥
व्यापीलें सकला दिशांस असला तो भक्त शैवाग्रणी॥
मानीतिनृप हा किं लोक आपुल्या चित्तांत चिंतामणी॥१०

(असें बोलून श्री शंकरास वंदन करून नारद मुनी जातात.)

**पार्वती**:- अहो प्राणपती, श्री नारद मुनीनें जें कथन केलें तें श्रवण करून आपल्या चरणारविंदीं श्रियाळ राजाची व त्याच्या स्त्रीची एकनिष्ठा खरी आहे किंवा दांभीक आहे हें पहावें अशी उत्कंठा प्राप्त झाली आहे.

**शंकर**:- प्राणप्रिये, त्या राजाचें सत्वहरण करावें एतदर्थ मी कुश्चळ असा अतिथीचा वेषधारण करून राजगृहाप्रत आतांच गमन करितों

(असें ह्मणून नेपथ्यांत अतिथी वेष धारणार्थ जातो.)

**पार्वती**:- अगे प्रियसखे कमलनयने, ऐकिलेंस का माझ्या प्राणनाथाला त्यांच्या भक्तां विषयीं कोणी कांहीं सांगितलें ह्मणजे लागलीच रूपांतर करून त्याजकडे जाऊन त्याच्या सद्भक्तीचा आद्यंत ठाव पहाण्याची नेहेमी उत्कंठा प्राप्त होते असा हा त्यांचा स्वभावच होय. आतां ही श्रियाळ राजाच्या गृहाप्रत त्याची स्वामीभक्ती पहावयास महाराज जाण्याची तयारी करीत आहेत.

**कमलनयना**:- हे अनंतशक्ति आदिमाये तुझा प्राणपती जो श्रीशंक-

---

१ पृथ्वी. २ राजा. ३ राजा. ४ खोल. ५ रत्नांची खाण. ६ वेष्टिलें. ७ शिवभक्तवर्य. ८ इच्छाफळ दाता.

र तो जगदुद्धारक, करुणार्णव असल्यामुळें सद्भक्तांची एक निष्ठा-कसोटीस लावून पाहून ती मनास आवडली ह्मणजे त्यास संसार-तापा पासून मुक्त करतो हें ठीकच आहे.

**पार्वती**:- हे कमलनयने, तूं ह्मणतेस तें खरेंच आहे, चलगे आतां आपण ही स्वस्थाना प्रत गमन करूं. (असें ह्मणून दोघी निघून जातात.)

## प्रवेश २ रा.

### स्थळ.

कांती नगरीं श्रियाळ राजाची सभा.

### पात्रें.

| | | | |
|---|---|---|---|
| श्रियाळ | कांतीनगरीचा राजा. | चिलया | राजपुत्र. |
| चांगुणा | श्रियाळ पत्नी. | अतिथी | कुष्ठलरूपधेत. शंकर. |
| भालदार | राज सेवक. | चोपदार | सेवक वगैरे. |



विदूषक.- कांहो सूत्रधार आतां पुढें कशीकाय गडबड व्हावयाची आहे हास्यरस उत्पन्न होईल असा कांहीं या नाटकाचा प्रकार आहे किंवा नाहीं तें सांगा.

सूत्रधार.- अरे हें नाटक एकंदरीनें करुणारस प्रधानच आहे. हास्य रसोत्पादक प्रत्यक्ष मूर्तिमंत पुतळाच तूं असतां व तुझें या सभास्थानीं नाटकास साह्य असतां हास्यरस उत्पन्न होईल. किंवा नाहीं अशी भ्रांती मूलक शंका घेण्याचें कारण काय?

विदूषक.- सूत्रधारा किती खुळ्चट तोस अरे माझे घरीं काय हास्यरस उत्पन्न करावयाचा चरक आहे? मीच हास्यरसाचा पुतळा आहें ह्मणतां तर इक्षुरसास प्राशन करितात तद्वत तुह्मीं मलाच ओंठ लावून माझाच घोट घ्या ह्मणजे तुमचें पोट फुगून जाऊन तृप्ती होईल.

सूत्रधार.- तूंतर व्यादमात केलीस असा कल्पक व समयोचित अनुवादक या भूतलावर मिळणें कठीण आहे काय वेड्याची ही शंका कोणीकडे गेली हो.

विदूषक.- मला कधीं ही तुमच्या सारख्या लघुशंका येत नाहींत आल्याच तर हे राजश्री दीर्घशंकेची व लघुशंकेची एकत्र गांठ घालण्याची पाळी आणणार.

सूत्रधार.- काय विलक्षण मनुष्य आहेसरे तूं आपल्या भाषणांत पाहिजे तिकडे सरकतोस याला काय ह्मणावें.

विदूषक.- विलक्षण ह्मणा कीं सलक्षण ह्मणा त्यांत माझ्या पित्याचें काय वेंचतें.

सूत्रधार.- तूं काळजी करूं नको मी बोलतांना घसरलों तरी तुझे आंगावर पडणार नाहीं परंतु पुढें कसें काय मुख्यत्वें करून घडवयाचें तें सांगतों. ( विदूषका, सावधान चित्तें श्रवण कर. )

आर्या.

कुश्चळ अतीत वेषा धारण करुनी प्रभू नृपागारा॥
जाइल सत्वा हरुनी त्याचें हेतू मनीं असा सारा॥१॥

औदार्याने देखुनि भूपतिच्या देव मुक्तिपद त्याते ॥
स्त्रीतें नसें चित्याच्या बारे देईल सांगतो तूतें ॥ २

सूत्रधार— भक्ती धरली ह्मणजे असाच जगदीश कृपेनें परिणाम गोड होतो

विदूषक— वः केवढा तरीं चमत्कार हा! ईश्वर भक्तीच्या योगें करून अशी अचल पद प्राप्ती काय? तरमग सूत्रधारा आपण ही भक्ती धरून मुक्तीची प्राप्ती करून घेऊं; परंतु ती कोठें असते व कशी धरतां येईल. तें मात्र सत्वर कथन कर.

सूत्रधार— अहा हा हीतर काय व्यक्ती पण व्यक्तीच आहे बुद्धीचा केवळ खंदक बेटा! अरे हें तुझें भांगपिणारा सारखें भाषण ऐकून मला राग येऊन माझ्या अंगाची आग होऊन जाते, विदूषका, तुझ्या मनांत तरीं काय आलें आहे? भक्ती ह्मणून कोणी स्वरूपसंपन्न स्त्री असते असें तुला वाटतें कीं काय? ती कोठें असते व कशी धरतां येईल असें भलतेंचरे काय विचारतोस?

विदूषक— सूत्रधार, मी अशी कल्पना लढविली आहे कीं, भक्ती ह्मणून देवाच्या घरीं कोणी दिव्य दासी असावी व ती आपण युक्तीप्रयुक्तीनें धरली ह्मणजे श्रीहरी आपल्यास मुक्ती भोगायास लावितो.

सूत्रधार— कायबेटा कल्पना समुद्रांत बुडून गेला आहे, नाना विध वाक्जल्पना करीत आहे. त्यास याच्या मनांत भक्तीरूप दासीस धरून मुक्तीची सक्तीनें प्राप्ती करून घ्यावी. असें आलें आहेसें वाटतें परंतु काय चमत्कार!! ही मूर्ती शृंगार रसात्मक अगाध काल्पनीक जलधींत निमग्न होऊन गेली आहे, विदुषका तुझी मूर्ती जशी विचित्र आहे तशीच भाषणाची धरतीही सकीर्तीची अप्राप्ती दाखविणारी आहे.

विदूषक— हो हो माझ्या मनांत हेंचकीं, भक्ती धरावी ह्मणजे मुक्ती मिळेल काय तरी चमत्कार एकीस धरावी ह्मणजे दुसरीचा लाभ होतो. वः बरेंच सोपें काम आहे.

सूत्रधार— बाप्पा चुकलों जनरीती प्रमाणें "भक्ती धरावी" अ-

सें ह्मटलें त्यावर त्या बृहस्पतीनें इतकी अक्कल खर्च केली, आणि बरा-
च वाक् पांडित्याचा उजेड पाडला, असो तीर ऐक भक्ती धरणें ह्मणजे
ईश्वरावर अनन्य भावें सद्भाव ठेवून त्यास शरण जाऊन तत्पद से-
वक होऊन राहणें याचें नांव भक्तीकरणें. समजलास आतां भक्ती
धरणें ह्मणजे तुझ्यासारख्या महान् पंडिता पुढें योग्य नाहीं.

विदूषक.- हें हें आतां समजलों मी कांहीं असा गवत्या गोमाजी
सारखा मूर्ख पंडित नाहीं मी तर प्रत्येक शब्दांतील अक्षरा अक्ष-
राचा अर्थ करून मजकूर जुळूं लागल्यास त्यावर स्वकपोल कल्पि-
त बुद्धीबलानें विलायती पात्रावर मात्रा देणारा गृहस्थ आहें हें
खूबसमजा.

इतक्यांत.

भालदार.- राजाधिराज महाराज.

राजा.- भालदार किमर्थ शब्द केलास.

भालदार.- महाराज, कोणी विद्रूप अतिथी महा द्वारीं प्राप्त झाला
आहे

राजा.- (लागलीच सिंहासन सोडून) असें कथितो.

आर्या.

देखुनि अतिथीतें नृप धाउनि त्याच्या पदांमिठी घाली॥
वत्सजसा धेनुकडे की धांवे मधु[1]कडे चि सरघाली[2] ॥ १॥

(अतिथीच्या चरणीं मस्तक ठेवून मोठ्या आदरानें त्यास सिंहा
सनावर नेऊन बसवितो आणि षोडशोपचारें पूजन करून ह्मणतो.)

राजा.- महाराज, आज आपल्या चरण दर्शनाचा अलभ्यलाभ-
या दासास प्राप्त झाला हा मज दासावर अनुग्रहच झाला आहे या-
स्तव मानसाचेठायीं जो हेतू अथवा जी इच्छा असेल ती मजप्रत क-
थन करावी. ह्मणजे तदनुसार वर्तन करण्यास सेवेंत तत्पर आहें.

अतिथी.- राजा श्रवण कर.

आर्या.

आलों दुरूनि येथें अतुल औदार्य परिसुनी कानीं॥

---

[1] मधु. [2] मक्षिका पंक्ती.

कीं यांचकास देशी इच्छाभोजन बहूत प्रेमानीं ॥

राजा.- स्वामिराज श्रीशंकराच्या रूपें करून मला सर्व पदार्थांची अनुकूलता आहे ज्या पदार्थांची महाराजांस इच्छा असेल ती यादासास कथन व्हावी. मी महत्प्रेम भरें करून स्वामिराजांस तो पदार्थ अर्पण करीन.

अतिथी.- हे राजन्, असेंच जर खरें आहे तर मी मागेन तो पदार्थ मला प्राप्त होईल असे विषयीं तूं आपल्या सुंदरी सहवर्तमान् मज प्रत पूर्वीच वचन दिलें पाहिजे नंतर मी आपली इच्छा प्रगट करीन.

राजा व चांगुणा.- हें घ्या आमचें वचन (असें ह्मणून त्याच्या हातावर हात लावितात.) स्वामिराज कोणती इच्छा असेल ती आज्ञा व्हावी.

अतिथी.- राजा, मला एक प्रकारचें नरमांस गृहण करण्याची इच्छा झाली आहे तर तें प्राप्त होईल किंवा नाहीं.

चांगुणा.- प्राणप्रिया, आपण वचन देऊन चुकलों आहों यास्तव कसें ही करून यास नरमांस द्यावें ह्मणजे आपलें वचन परिपूर्ण होईल.

राजा.- प्राणसखे प्रयत्न केला असतां नरमांसही आणवितां येईल परंतु दिलेल्या वचनास टळावयाचें नाहीं आपण नरमांस देतों ह्मणून महाराजास सांगूं या.

राजा व चांगुणा.- महाराज स्वामिराज, आपले आज्ञेनुसार वर्तन करण्यास आह्मी सिद्ध आहोंत नरमांस आणून सत्वर अर्पण करितों.

अतिथी.- राजा श्रवणकर. सांगतों या प्रकारचें नर मांस मला इच्छित आहे.

पृथ्वीवृत्त.

न हेरे जन मांस मी पतकरीन चोरासरे ॥
धरूनि अणुनी मला जरि तुं अर्पिलें तें खरें ॥
न घेइं भिकधी नृपा विकत आणिलें तें जरी ॥
मलो सुन्दिर चौरुसें तेरस मांस दे लवकरी ॥१॥

चांगुणा.- (करद्वय जोडून) स्वामिराज मी आपलें निजतनू मांस

१ भिकारी. २ त्याहाले जोक. ३ शठ. ४ सुंदर असे. ५ मृदू.

आपल्यास अर्पण करण्यास सिद्ध आहें स्वस्थमानसें करून भो-
जनाचा स्वीकार करावा.

राजा:- स्वामिराज ममदेह मांसाची इच्छा असल्यास मीहि तें अ-
र्पण करण्यास सिद्ध आहें आपला हेतू परिपूर्ण करावा.

अतिथी:- हे राजन्, तुह्मी उभयतां याचक जनाचे दाते आहांत
आणि पवित्र ही आहांत परंतु तुह्मांस भक्षण केलें असतां हें अ-
न्नसत्र खंडन होईल. या करितां तें तर उपयोगीच नाहीं, राजा मम
मानसाचे ठायीं कोणते प्रकारचें नरमांस ग्रहण करण्याची इच्छा प्रा-
प्त झाली आहे ती कथन करितों. सावधानचित्तें श्रवण कर.

पंचचामर वृत्त.

तूमच्या कुमार बाळ चीलया सुलक्षणी ॥
प्रीयतो तुह्मास फार ह्मा किलोचि त्याक्षणीं. ॥
भक्षणार्थ हाचि अर्थ मन्मनांत मी अणी ॥
ह्यालना तरी धरी न आस सत्वरक्षणीं ॥ १ ॥

या प्रकारचें मांस सत्वर मजला द्यावें नाहीं पेक्षां सत्व हरण क-
रून जाईन.

राजा:- प्राण वल्लभे, अतिथी काय ह्मणाला हें श्रवण केलेंस काय?
आजपर्यंत बहुत अतिथी आपले गृहीं प्राप्त झाले परंतु श्रीशंकर
रूपें करून त्यांच्या सर्व मनेप्सित कामना आपणास पूर्ण करितां
आल्या परंतु ही गोष्ट तशी नाहीं सत्व राखण्याचा आजचा हा मो-
ठा अणीबाणीचा प्रसंग आहे.

चांगुणा:- प्राणेश्वरा, माया मोह जाळ्यांत गुंतून न पडतां अति
थीची इच्छा पूर्ण करावी असें मला वाटतें.

राजा:- प्राणेश्वरी, मी ही असाच हेतू धारण केला आहे त्यास-
तुझें अनुमोदन पडलें हें जसें पायसांत शर्करा मिश्र केल्या प्रमाणें
झालें आहे.

राजा व चांगुणा:- आपली आज्ञा आह्मा उभयतांस शिरसा-

१ उत्तमगुणी. २ ठेवूनका. ३ आशा.

मान्य आहे आपण चिलया बाळास घेऊन जावें आणि आपली इच्छा तृप्त करावी.

**अतिथी**:- ( आसनावरून एकीकडे होऊन ) अरे राजा, मी काय वृक, व्याघ्र, रीस इत्यादिकां सारिखा क्रूर हिंसक प्राणी आहें कीं काय ? तर तुझ्या पुत्रास घेऊन जाऊन एकांतीं भक्षण करूं ? असें अनुचित भाषण करशील तर शाप देऊन सत्वहरण करून जाईन.

**चांगुणा**:- महाराज स्वामिराज आपण त्या दीन जनावर कोपाविष्ठ होऊं नये आपली जी इच्छा असेल ती आह्मांस सांगावी आपले सेवेंत अंतर करणार नाहीं ( असें ह्मणून अतिथीस पुनः सिंहासनावर बसविते. )

**अतिथी**:- राजा, सांगतों या प्रकारें त्वत्पुत्राचें मांस सिद्ध करून मजप्रत अर्पण कर त्यांत अंतर झाल्यास क्षमा होणार नाहीं.

प्रहर्षणी वृत्त.

कापोनी निजकरीं मांस चांगुणेनें ॥ रांधावें सकळ तसें च नेहिमानें ॥ अर्पावें मग मजला अशा प्रकारें ॥ शोकातें न करी हरीन सत्वसारें ॥ १ ॥

**राजा**:- प्राणप्रिये, स्वामिनीं काय सांगितलें तें श्रवण केलेंस ना ? त्वां स्वकरानींच हें दुर्घट कृत्य करून स्वामिराजास संतोषीत करावें असें महाराजांचें निक्षून सांगणें आहे यास्तव कसा काय विचार करावयाचा माझें मत तर स्विकारिलें कार्य सिद्धीस न्यावें असें आहे.

**चांगुणा**:- प्राणनाथा, ( खालीं मान घालून ) मी आपल्या विचारास सोडून नाहीं, दुर्घट प्रसंगीं सत्वरक्षण झालें असतां तें अनुपमेय भूषणास्पदच होईल.

**राजा व चांगुणा**:- ( अतिथीचे चरण सद्भावें धरून ) स्वामिनः आपले आज्ञे प्रमाणें करण्यास आह्मीं सिद्ध आहोंत.

**चांगुणा**:- ( चिलया बाळास हांक मारिते. )

---

१ सन्मानानें. २ हरण करीन.

दिंडी.

येई येई चीलया अरे बाळा ॥ गुंतलासी कोणत्या बरें खेळा ॥
धाव वेगें ये माउले अनीन ॥ आला आहे तुजसाठिं अकस्मात १

(या प्रमाणें बाळकास हाक मारितांच तो बाहेरून धांवतच आला, येतांच अतिथीस नमस्कार करून मातापित्याचे चरण वंदन करितो आणि हस्त जोडून त्यांच्या पुढें उभा राहून काय आज्ञा आहे असें विचारितो.

चांगुणा- अरे परम प्रिया बाळका, तुजवर मोठा दुर्धर प्रसंग आला आहे. बाळका या मुखानें तें वृत्त तुला कसें रे सांगूं परंतु (इतकेंच)

चिलया- मातुश्री "परंतु" इतकेंच अर्धेंच ह्मणत आहेस तो तुझें मुखकमल कांबरें म्लानत्व पावलें मानसाचे ठायीं अशी कोणती चिंता प्राप्त झाली आहे? ती संपूर्ण या बाळकास कथन करावी.- मी आपले आज्ञेंत तत्पर आहें.

चांगुणा- बाळचिलया, प्राप्त अतिथी भोजनार्थ त्वत्तनुमांस मागत आहे. बालका आतां कसें रे मी करूं तूं एकुलता एक आमच्या उभयतांच्या जिवास आधार आहेस त्यांतून परम सुंदर गुणवान् असा अनेक गुणालंकृत जोतूं त्या तुजविषयीं अतिथीनें इच्छा धरिली आहे. कसा रे आज हा प्रसंग प्राप्त झाला आहे. आतां आपलें संपादित सर्व सत्व हरण होण्याची वेळ खचीत जवळ आली आहे यांत संशय नाहीं. बालका, राजसा, माझ्यानें पुढें बोलवत ही नाहीं "नेत्रांस पाणी येतें."

चिलया- हे दयानिधे, मातुश्री, यांत काळजी करण्यासारखें तर मला कांहींच दिसत नाहीं हा मोठा माझ्या भाग्योदय वृद्धीचाच पूर्ण समय समजला पाहिजे. मी तर महा प्रेम भरें करून हा नरदेह शिवार्पण करण्यास सिद्ध आहें. अतिथी तृप्त झाला असतां भक्तवत्सल श्री भगवान् उमारमण संतोष पावेल, मृत्यलोकाचे ठायीं जन्म घेऊन या मृन्मय देहाची अशी सत्कृत्यांत सार्थकता होईल तर ही गोष्ट अनुपमेय लाभप्रदच मानली पाहिजे. याहून काय

अधिक आहे ?

चांगुणा.—( हुंदका टाकून ) बाळका, हें तुझें वेदांत भरित बोलणें ऐकून सखोल विचारें पाहतां याशीं समतोल असें को- णतेंच उत्तर करण्यास याप्रसंगीं मी पात्र नाहीं. हे अतिप्रियकरबा- ळका परमस्नेहाळा तुजसाठीं मी किती केलें आणि किती सोसिलें आणि सर्व काळ पती सेवेंत तत्पर राहून पुत्रप्राप्तीस्तव जगन्नियंत्या परम कृपाळू परमेश्वरास किती आराधिलें ? तें सर्व सांगूं जातां माझी रस- ना ही भंगून जाईल. मदन कांतीस मागें सारणारा प्रत्यक्ष पुतळा, महा गुणवान्, महाचतुर असा अनेक गुणालंकृत जो तूं माझ्या उदरीं प्राप्त- झालास तेणें करून मी प्राणसख्या सहवर्तमान किती आनंद मानीत होतें त्यास उपमाच नाहीं असें असतां हे प्रियबाळका तुझें पिसीत मी आ- ज निजकरानीं काढून तें पक्क करून आतां या अतिथीस देणार ना!!! शिव शिव अरे बाळा आल्या समयास माया मोहांत न पडतां सत्व रक्ष- ण केलेंच पाहिजे त्याचा शेवट गोड करणें जगदुत्पालक जो श्रीभगवान् उ- मारमण त्याजकडेस आहे. माझा सर्व भरवसा त्याजवर आहे ( चि- ल्यास कडेवर घेऊन मुखचुंबन करून ह्मणते. )

चामर वृत्त.

मंदमंद हास्यबोल, बोबडे तुझे असे ॥
कोमलांगि रम्यवर्णि रूपबाळ मित्रसें ॥
दंतपंक्ति, दिव्यकांति, हस्तपाद कंजसे ॥
अशा तुला करीस्वयें बाळका वधूं कसें ॥ १

स्त्रग्धरा वृत्त.

माझ्याबाळा चिल्लया नयनकमलहे पाहुमीकाय आतां
शोभीतुझीमी कापी निजकरीं सरसया दुर्घट दुःखवार्ता ॥
जावोनिथांजनीं वावदतिलमजला निर्दया राक्षसीही
आहे साची असें रे वदन लपउमी जीवहा जात नाहीं ॥ २

चिलया.— मातुश्री, आपण किंचित ही शोक करूं नये मी इह लोकीं

१ शोभायमान. २ कमळ असे. ३ मान.

चा वास सरल्यानंतर त्वदुदराचे गर्भी पुनरपि जन्म धारण करीन त-स्मात् माया मय जालांत अगदीं मन गुंतूं न देतां अतिथी कार्यार्थ या-मृन्मय देहाचा पुढें जो प्रकार कर्तव्य असेल तो निःशंक करावा.

( इतक्यांत. )

**अतिथी.**- अरे राजा किती उशीर हा, अरे ममोदरीं क्षुधिताग्नि प्र-ज्वलित होत आहे याकरितां अति सत्वर कथन केल्याप्रमाणें त्वत्तन-य मांस भक्षणार्थ आण नाहींतर शाप देऊन जाईन.

**राजा.**- अगे प्राणप्रिये, तूं हा असा अघोर विलाप करून सुकुमा-र बालकाचे गुण आठवीत बसलीस तर तो आरोपतां आरोपणार-नाहीं. आतां हें सर्व सोडून सत्वर अतिथी तृप्त करावा एतदर्थ या बा-लकाचें वपुचर्म काढून मांस पक्क करून आण (सद्गदित होऊन) जा आतां त्वरकर.

**चांगुणा.**- (नेत्रांतून अश्रुधारा गळत आहेत.) बालका एकवार वदन चुंबन तरीं करूं दे (चुंबन करिते आणि चिलयास कडेवर घेऊ-न शीर छेदण्या करितां पाकशाळेंत जाते.)

## प्रवेश ३ रा.

स्थळ (पाकशाळा.)

पात्रें.

श्रियाळ राजा. चांगुणा शशिवदना.



शशिवदना.— बाईसाहेब, काय हें तुमचें धैर्य आमचा मुलास जर कोणी विनाकारण हात लाविला तर त्या मनुष्यांस शासन करण्याविषयीं आमच्या अंगाच्या तिळपापड होऊन जातो. तसेंच या राजपुत्रास जर कोणी अहो अरे केलें तर तळव्याची आग मस्तकास आमची देखील जाते मग आपण तर स्वकरींच हें दुर्धर अनिवार कृत्य करणार तेव्हां या कृत्यास काय ह्मणावें.

चांगुणा.— अग प्रियसखे शशिवदने आतां सख्यानों तुह्मीं पाहिजे तें ह्मणा, मी महा पापीण, महादुष्ट असा जनांत मला कलंक नर लागणारच आहे परंतु तुह्मी असें पहा कीं, पुत्ररत्न नष्ट झाल्यास बहुत कष्ट करून ईश्वराची उत्कृष्ट सेवा केली तर तो सर्वोत्कृष्ट फल देऊन हारपलें रत्न पुनरपि प्राप्त करून देईल. परंतु सत्व हरण झालें असतां इतक्याही गोष्टींची आशाच करणें नलगे. तरसखे मला का दुःख वाटत नाहीं गे ? अंतरीं जें काय होत आहे त्याची पोट उकल करूं गेल्यास माझा कंठच दाटून येतो. सखे बहुत विचार करितें परंतु हें गे बाई कसें होतें कोण जाणे.

शशिवदना.— आपल्या बोलण्याचा सर्व भाव समजला काय पाहिजे तें केलें तरीं जें आपल्यास करावयाचें आहे तें केल्या वांचून रहाणार नाहीं याचें नांव धैर्य व याचेंच नाव सत्वता, वाहावागे माउले तूं धन्य आहेस तुजसारखी धर्मनिष्ठ पतिव्रता या त्रिभुवनांत देखील सांपडणें कठीण, मायामय हें जग असतां तुह्मीं त्यापासून कसे भिन्न आहांत इतकी जिवावर गोष्ट येऊन बेतली तरीं सत्व सोडणेंच नाहीं, अं हं तर आतां बाईसाहेबांनीं विलंब लावूं नये अतिथी कोपाविष्ट होऊन भलतेंच होईल. बाल्याही जात आहे आणि दशम्याही जातील अथवा तेल व तूप जाऊन धुपाटणें मात्र होतां येईल. असें होऊं नये याकरितां हें सर्व विसरून निष्ठुरपणें डोळे झांकून पुत्र पिशीत काढून तयार करा मजकडे अथवा त्या निरपराधी बाळकाकडे ही कंठ दाटून येऊन सहृदीत होऊन पाहूं नका.

चांगुणा.— प्रिय बालका, ये आतां (कडेवरचा मांडीवर घेते आ-

णि नेत्रांतून अश्रुधारा वहातात.)

शशिवदना:- बाई साहेब आतां उगीच कष्टी कां होतां? जगदीशा चें स्मरण करून जें दुःखरूप विष पोटांत उत्पन्न झालें असेल त्याचें शमन करा.

चांगुणा:- प्रिय सखे काय सांगूं कर्माची गती अगम्य आहे.

पद.

मजला मानव ह्मणु केसें॥ वदनें यामिनि चरि ऐसें॥ ध्रु०॥ कर्मा करितें नीच अपार॥ व्यर्थ चि माझ्या शिरिं भार॥ लागला माझ्या उदरीं हा बाण॥ होतो व्याकुळ माझा प्राण॥ निर्दय मज हें नरि कैसें॥ उपमाना हिंच त्या ऐसें॥ जाळूं आतां हा मी काय॥ करूं नरी बाळा याहुनि काय॥ पापाची ही साची खाण॥ पवनारीचें गेर मी जाण॥ विधिनें लिहिली भाळीं काय॥ लिपि ही दुर्धर नाहिं उपाय॥ कर्मगतीचा नाहीं च थांग॥ चालत नाहीं येथें लाग॥ मजला मानव०॥ १

मंदाक्रांता वृत्त.

हाहा बाळा हृदय फुटतें जीव माझा गळाला ॥
भासे आतां त्रिभुवन मला शून्य हें योग्य आला ॥
कैसा हारे मनि न धरवे या वियोगानळाला ॥
चिंता ही बा पडुनि मजला जाळितें काळ जाला ॥ १॥

ईश्वरा त्वद्रूर्कार्य रत्नेच वज्रसम हृदय करून मी असें करितें तें तुला अर्पण असो (असें ह्मणून शीर छेदन करून मांस काढिते.)

शशि वदना:- बाई साहेब तुह्मी धन्य आहांत ईश्वरा या महापतिव्रतेचें सत्व रक्षणार्थ काय हें कृत्य! असा निचा प्रेम फाडून तिला काय तरी तूं देणार? असो बाई साहेब हें इतकें कृत्य तर होऊन चुकलें आह्मां सांत्वन करण्यास सर्वस्वीच आधार नाहीं सा झाला. परंतु मला वाटतें सर्व गात्रांमध्यें शिरकमळ प्रधान मानिलें आहे तर कृपा करून तें वढें मात्र धनि साहेबांनीं काढून एकीकडे ठेवा

---

१ शरीर. २ खरी. ३ सर्प. ४ ब्रह्मदेव. ५ कपाळीं. ६ कठीण ७ नाहींसें.

वें आणि बाळीनें पिसिताची सिद्धता करावी.

चांगुणा— अगे शशिवदनें, मलाही असेंच वाटतें. आतां हें शिरकमळ मी आमरणांत दृष्टी पुढें ठेवीन ( असें ह्मणून जवळच शिंक्यावर ठेवितें ) आणि बाळीनें मांसास आंच लावून पक्क करितें.

इतक्यांत.

विदूषक— कांहो सूत्रधार, या अतिथी बावाचा मोठा चमत्कार वाटतो. पहा आमच्या दाराशीं कधीं कधीं अतिथींच्या ( भिकाऱ्यांच्या ) झुंडीच्या झुंडी बैलांच्या तांड्या प्रमाणें येतात. मग ते जर या अतिथी प्रमाणें मुलें भक्षावयास मागतील तर आह्मांस शें दोनशें लेंकुरवाळ्या बायकांस लटपटीनें बाळगून झटपटीनें खटपट करून च्यार पांचशें बऱ्या कच्च्यांचा हाप्ताच भरून द्यावा लागेल.

सूत्रधार— मारीषा, हा अतिथी तसा नव्हे बरें हा तृप्त झाला असतां काय प्रसाद करील याचा नेम नाहीं असें मला याच्या विचित्र याचने वरून वाटतें.

विदूषक— अरे सूत्रधारा, त्या कोमल बालकाचें मांस मिटक्या मारून खालें ह्मणजे स्वतः राजास व त्याचे स्त्रीस खावयाचें हें राजेश्री हल्लु बिल्लु चालवून एकावर एक हल्ले करणार असाच या मूर्तीचा एकंदर घाट दिसतो " तस्मात् हा तृप्त झाला असतां काय करील " असें जें आपण भाषण केलें तेंच खरें अहो पोरें खाणारा अतिथी कोठें पाहिला आहे काय ? मला वाटतें हा कोणी क्षुधित राक्षस असून कोंवळ्या मांसाची इच्छा धारण करून अतिथीचा वेषघेऊन आला आहे, शिवशिव या राजास एकुलता एक महा प्रयासानें दिव्य पुत्र प्राप्त झाला व तोही अनुपमेय स्वरूप संपन्न महाचतुर महा गुणवान् असा असल्या मुळें राजाधिराज महाराज श्रियाळ राजा व त्याची स्त्री महा पतिव्रता चांगुणा यांची त्याजवर कितीबरें अत्यंत ममता असेल त्यास उपमाच मिळणें कठीण आहे हा पुत्र त्यांस त्यांच्या प्राणाहून

ही अधिक असेल यांत तिळमात्र संशय नाहीं. हरहर तस्मात् अशी-त्या मुलाची बुधली कांहो वर आली. हें अघोर कृत्य पाहून माझ्या आं-गावर तर रोमांच उभे राहातात.

**सूत्रधार**:— अरे विदुषका, ईश्वर आपले भक्तांची निष्ठा कोणत्या तरी रूपानें पहातो ती त्याच्या पूर्ण कसोटीस उतरली ह्मणजे मग तो त्या भक्तजनावर पूर्ण अनुग्रह करून त्यांस चिरकाल आनंद स्था-नाची प्राप्ती करून देतो. ह्मणजे या जनन मरणा पासून मुक्त करितो

**विदूषक**:— कोणावर कृपा करणें झालें ह्मणजे आधीं कसोटीस-लावून पहावें असें यांत सिद्ध झालें आमची ही प्रियपत्नी आह्मां स झोपेंत रात्रीं लत्ताप्रहार करिते तेव्हां ती का भक्तिपुरःसर करि-ते किंवा आमची अठरा मासे चांदी बनवावी ह्मणून करिते याची तरीं कसोटी मोट्या एखाद्या गंडकी चिऱ्यास लावून पाहिली ह्मण जे जर माझ्या कसोटीस ती न उतरली तर मीहि तिला अचळ मुष्टी ची कुट्टी देऊन तुट्टी पाडून घेईन ह्मणजे आपलें " संगत्यक्ता सु-खी भव " असें घडेल. कां सूत्रधार बरी मसलत आहे ना?

**सूत्रधार**:— तुझ्या अकलेस तर कोणाचीच अक्कल लागत नाहीं. असो तुला काय ह्मणावें तूं अवतारच तो घेतला आहेस परंतु केव-ळ ओली भांग आहेस खरा. खूप आहेस तुझ्यासारखा विचित्र पु-रुष तूंच आहेस अशी व्यक्ती त्रिभुवनांत ही मिळणें कठीण.

( चांगुणा रुप्याच्या ताटांत सिद्ध केलेलें मांस अतिथी-पुढें आणून ठेविते. )

**चांगुणा**:— ( अतिथीस. ) हे करुणानिधे महाराजा, आपले आज्ञे प्रमाणें मम बालकाचे कोमल तनूचें मांस काटून तें सिद्ध करून आ-णिलें आहे हें ग्रहण करावें.

**राजा**:— अतीतराया, आपले आज्ञे प्रमाणें निजसुत तनू मांस परि पक्क करून आणिलें आहे तर भोजन गृहण करावें स्वामिराज.

आर्या.

मांसा सिद्ध करोनी आणियलें गा कृपाब्धि[1] हें भक्षीं ॥

---

१ कृपासागर.

शंका सोडुनि आतां आनंदें सत्व आमुचें रक्षीं[१]

बालक सुंदर होतें परिल्या त्वत्या असे खदाजेनें ॥

केलें गृह्हण करावें प्रार्थावें किंनिनरी मि अज्ञानें २

माया जाला सोडुनीं केलें वज्रापरीस हें हृदय ॥

कुधिणास्वीकारावें व्हावें आतां बरें सदा सदय[३]

होताकधिणा हि पणापण आपुल्या आज्ञेपरी असें केलें॥

सत्वारक्षण करणें त्याचें आह्मीं सदा हि भूकेले ४

अतिथी:-( आसना वरून उठून कोपाविष्ट होत्साता ह्मणतो अरे राजा !

( चामर वृत्त. )

मोहपाशिं योषिंना तुझीपडोनि ठेविलें ॥

मस्तकासरे गृहांत त्यास नाहिं छेदिलें ॥

हा शरीर पाक होय यांत नाहिं गोडिरे ॥

सत्वरक्षणांत नाहिं कांहिं अर्थ सोडिरे ॥ १ ॥

या प्रकारें वंचना करून शिरकमल किमर्थ झांकून ठेविलें, अरे राजा, " सर्वेषु गात्रेषु शिरः प्रधानं " असें असतां तें जर प्राप्त झालें नाहीं तर माझा क्षुधिताग्नि कसा शांत होईल. तां मला - निरर्थक नादीं लाविलेंस आतां मी जातो ( उठून त्वरेनें दरवाजा बाहेर जातो. )

## प्रवेश ४ था.

स्थल.

राज द्वारा बाहेरची जागा.

पात्रें

| | |
|---|---|
| अतिथी ........................ | कुष्ठ स्वरूप घेतलेला शंकर |
| राजा. ........................ | कांतीनगरीचा राजा. |
| चांगुणा. ........................ | श्रियाळ पत्नी. |

---

१ इंद्रायुध. २ दयाळू. ३ स्त्री.




राजा.— अगे प्राणवल्लभे, शिरकमल कशा करितां ठेविलेंस? तूं-अद्याप मोहपाशांत अडखळून राहिली आहेस कीं काय? हें तूंफार अश्लाघ्य केलेंस हा अतिथी आतां परम कोपायमान् होऊन इच्छाभोजन न करितां सत्व हरण करून जात आहे आतां त्या दुःखास-तर पारावारच उरला नाहीं. आपलें दुर्दैव पक्केपणीं ओढवलें खरे हर हर!! एकतर सकल गुणालंकृत मम बालक नष्टगत झालें आणि नें दुःख कसेंही करून विसरावें तर अतिथीही सत्व हरण करून विन्मुख चालता झाला आतां कसें करावें?

आर्या.

प्राणसखे अतिथी हा भासे मजला जिनेंद्रिय दृष्ट॥
शिरकमळा ठेवियलें ह्मणुनी झाला बहून कोपिष्ट॥१

स्वागता वृत्त.

लाविलें परतुनी अतिथीला जाहला समज हा अनिघाला॥ बालका असूगता नयनी मीं पाहुं-

१ आत्मज्ञानी. २ कोपायमान. ३ माया.

काय विनंया कथनामी ॥ १ ॥ ॥ ॥

विदूषक— कां सूत्रधार, पाहिलेंसना, "दुनियां झुकती है पर झुकाने वालाचाहिये" या अतिथीनें सर्व रंग बेरंग करून सर्वांस दंग करून सोडिलें ऐक.

आर्या.

पाडियलें अतिथीनें सात्विक भूपाल वैंय घोरटाळीं ॥
अश्वोपरि दिधली त्या भोंदुनियां काळिं काय होटाळी १
गेला पुत्र तथापी स्त्रीसह राजा अतीत धुडाळी ॥
रंग कसा हा झाला घेगा आतां करावरी टाळी २

चांगुणा— प्राण वल्लभा, आतां दुसरा कायविचार करावयाचा-आहे ? कसें ही करून त्या अतिथीस समजावून आणिलेंच पाहिजे मग त्यापायीं देह जावो अथवा राहो. ( असें ह्मणून उभयतां ही स्वामि राजा पुढें हस्त जोडून ह्मणतात. )

राजा व चांगुणा— अहो स्वामिराज.

श्लोक ( भुजंग प्रयात वृत्त. )

करोनी दया राग हा मानसांत नठेवीं अतां लोळतों त्वत्पदांत ॥
नजाणूनि झालें असें चित्तशांत करीं गा दयाळा नपाहीं मदंत १

श्लोक ( वसंत तिलका वृत्त. )

दासावरी सदय होउनियां क्षमेनें, तूं गा करी लवक-
री शिर ठेविलें ने ॥ अर्पी अतां निजकरीं पदसारसा-
नें, तूझ्यापरी न हरिसत्व असून जेनें ॥ १ ॥ ॥

चांगुणा— देया घनास्वामिराजा ( विनंती करिते. )

आर्या.

आल्यें शरण तुला मी घालीं अन्याय हा आतां पदरीं ॥
सत्वाहरूनी जातां वदतिल जनकीं असेहि पापंदरी १
नेणतपणें मि चुकल्यें कोपा टाकुनि दयाचि राहूं द्या ॥

---

१ विचारास. २ सांग. ३ सत्यवादी. ४ श्रेष्ठ. ५ घोडा. ६ तुझ्यापायांत. ७ माझा अंत. ८ पदकमल. ९ प्राणच. १० पाप गुहा.

येतों परतुनि करितों इच्छाभोजन असा मला हूं द्या२

पृथ्वी वृत्त.

दयार्ह वळशील तूं जरिन काळ जी मी करी ॥
चळापरतुनी अतां तुमनिहीं असे किंकरी ॥
मना करूनि मोकळें गुणनिधी वळे मेघसा ॥
पुढें न वदवे बसे पडुनि कोरडा हा घसा ॥१॥

अतिथी.— अरे राजा, एकवार तुला क्षमा करून मी परत येतों प रंतु पुढें सांगतों या प्रकारें करून त्वत्तनय शिरकमळ मांस सिद्ध क- (रावें.

शार्दूलविक्रीडित.

आतां तें शिरस त्वरें च नयना पुढें च आणून गा ॥
कांडावें निज हस्तिनें हि ठेवून तूझ्याच धैर्या नगा॥
अश्रू नाणि कधीं नृपा नयनिरे खेदा न ये मानणें ॥
गेला पुत्र नसें चि सत्व अवघें जाईल हें जाणणें ॥१

राजा.— करुणाघना महाराजा, कृपाकरून पूर्ववत् सिंहासना- रूढ व्हावें. (असें ह्मणून अतिथीचा कर धरून मोठ्या आदरानें त्यास रत्न खचित देदीप्यमान् अशा सिंहासनावर नेऊन बसवितो.)

राजा.— प्राणप्रिये, या अंतरसाक्ष महाराजानीं काय कथन केलें हें श्रवण केलेंस ना? आतां त्वरें करून पाकशाळेंत जा आणि य- त्किंचित् ही कांकूं न करितां अति त्वरें करून आपल्या प्रियकर बाल कांचें शिरकमल घेऊन ये. आणि अतिथी रायाचा आज्ञेनुसार व- र्तन कर.

चांगुणा.— प्राण वल्लभा तसेंच करितें. (नृपललना शिरकमळ- घेऊन येते.)

अतिथी.— हे नृपसुंदरी सांगतों श्रवण कर.

साकी.

मंगल मंगल गीत मनोहर गाउनि शिर हें कांडीं ॥

१दयापात्र. २दासी. ३नबोलवे. ४समोर. ५स्त्री. ६नेत्रोदक

हाय हाय तूं न करीं टाकीं दुःखविषाची कांडी ॥१

विदूषक— का सूत्रधार, बाबा आतां त्या चिलया बाळाचें डोस्कें कांडावयाचें ना? ठीक ठीक बडव बडव बडविलेंच पाहिजे असेंच कुण त्यांना तरीं आपल्या आंडील बैलाचे आंड सैल होण्या करितां खूपच ठेचावे लागतात. तसेंच हें ह्मणावयाचें बरें तर आतां मी आपला हिम्मत धरून उगाच गम्मत पहात बका सारिखा ध्यान लावून उभा राहातों.

सूत्रधार— विदूषका, कसारे तूं कठोर ह्रदयाचा उत्पन्न झालास (उंदराचा जीव जातो आणि मांजराचा खेळ होतो.) याच ह्मणी प्रमाणें तुझें कृत्य दिसलें अरे हें त्या महासतीचें सत्वरक्षणार्थ पर्वतप्राय धैर्य व महान् औदार्य अवलोकन करून आह्मी सर्व सभाजन या रंगभूमीवर दंग होत्साते गुंग होऊन पडलों आहोंत आणि तूं तर डोस्कें बडव बडव बडवावें ह्मणतोस. हें एक परम आश्चर्य कारकच आहे. अरे त्या राजराजेश्वराचें व त्याची प्रियपत्नी महासाध्वी जी चांगुणा नामाख्य तिचे कांहींसे गुणवर्णन करितों ते श्रवण कर. ह्मणजे तुझ्या मनाची खातरी होईल.

अमृत ध्वनी वृत्त.

नीलालका नमिति शीला हि दिव्य वदनाला नसो-  
महरितो। गेला वनांत नयनाला विलोकुनि निवाला  
मनीं कुरंगतो ॥ झाला मृगेश हि कृटला विलोकु-  
नि मनीं लासखेद सुदती। बोलानि लालुह्मि रति  
ला तुझ्याकीं स्वरुपाला नमी अशि अती ॥ १ ॥

शार्दूलविक्रीडित वृत्त.

नारी नार्मन हारिणी हितरणी सांचार वाक् धोरणी।  
स्त्रैणीं जो रमणी दिसे रतिउणी खाणी गुणाची गणी॥  
ईशानें करणी करीच धरणी केली कि इंद्रायणी

१ कृष्ण. २ काळादगड. ३ हरीण. ४ स्त्री (सुदंता) ५ मदनस्त्रीला. ६ फांनी. ७ नराचें मन. ८ आचारशद्ध. ९ भाषणचतुरा १० रम्यवर्णी ११ मदनस्त्री. १२ (इंद्रपत्नी.

ही दीनोद्धरणी असे नरमणी प्रीयामनोहारिणी ॥ १

राजाचें वर्णन.

रूपें जो स्मररसा जनानृवेरसा भूपां दिसे वीररसा ॥
धैर्यें जो धरसा अरीं सगरसा पीयूषवाणीनरसा ॥
दीनां जो सुरवृक्षसा स्वजनसा भृत्यांसि माहेरसा ॥
आर्यां जो सन्मानसा चतुरसा श्रीयाळ राजा असा १

अशा प्रकारें हें सकळ जनमान्य दंपत्य असतां त्यांजवर कसा बिकट प्रसंग गुजरला आहे हें मनांत आणून मी सर्व सभाजनांसह वर्तमान् परमदुःखीत झालों आहें आणि तूं रे अनावर असें भाषण करून आमच्या मनावर दुःखभरीत थरावर थर देतोस ह्मणून आं-गावर रोमांच उभे राहतात.

विदूषक.- अरे अद्याप चिलयाचे डोक्याचें कांडात काढलें नाहीं तोंच तुमच्या आंगावर रोमांच उभे राहिले मग पुढील कृत्य पाहून तर दुःखसमुद्रांत जाऊन गटगट् गटांगळ्या खात बसाल. आणि-त्यासमयीं हेंच फक्कड अक्कड करून झडकर तुह्मांस गटंगळ्या खा-तांना हातानीं बाहेर काढतील. (जरीं हें दुर्धर कृत्य आहे तरीं परि-णाम चांगला होईल. असें अन्योक्तीनें सूचवितो. )

चांगुणा.- हे करुणाघना, स्वामिराजा, त्वदाज्ञेनुसार शिरकमळ कंडणास आरंभ करित्यें.

शिरकमल कंडनकालीगीत.

साक्या.

धन्य धन्य मज उदरीं येउनि केलें भूपकिशोरा ॥
निष्ठुर होउनि धाव घालितें सहन करींस कुमारा १
सरवया जाशी मज टाकुनिया तुजसंगें मी येई ॥
राहिं उभा तूं क्षणभरि आतां टाकुनि मज ना जाई २
मोक्षद्वीपामधून कर्पों भरून घेइल आतां ॥

---

१ मदनासा. २ नरवर. ३ शूररसा. ४ शत्रूस. ५ विषासारखा. ६ अमृत. ७ कल्पवृक्ष ८ सेवक ९ पंडितजन. १० बालक. ११ मोक्षस्थानरूपबेट १२ माल.

बालक माझ्या कैलासीची पेठ लक्षूनी जातां ३॥
सांब पदाब्जाजाशी करुनी सार्थकता देहाची ॥
जाइन मीहि निश्चंच सत्वर ईशोवर देहाची ४
कठोर मन हें करुनी खूशिर कांडीतें ताऱ्हयामी
लज्जा रक्षिलें त्या कर्माची सकलजगाचा स्वामी ५

श्लो० मालिनी वृत्त.

जलविरेहित बारे वांचतो काय मीन ॥ तुजविणस
रवयामी जाहलें फार दीन ॥ जरि मन बहु केलें बाल
का हें कठीण ॥ तरि मृजधरवेना धीर मी सौख्यहीन ॥ १

रथोद्धता वृत्त.

दाउं मी वदन काय हें जना ॥ वाटते बहुत लाज या मना ॥ कांडितें शिर कसें हि पापिणी ॥ बोलतील मजला असें जनीं ॥ १ ॥ ॥ ॥

इंद्रवंश वृत्त.

ऐसा दिसेना गुणवंत शोधितां ॥ बाळा चिलीयासम रत्न तें अतां ॥ गेलें करांमी प्रभलाच अर्पण ॥ केलें रवरें तें वदु काय या विण ॥ १ ॥ ॥ ॥

द्रुतविलंबित वृत्त.

कुंच कमंडलु सुंदर हे परी फुटुनि पायस कंचुकि बाहेरी ॥
बहु नयेन असे मम बालका करुन री मी कसें क्षितिनायका १

लावणी.

( दोदिवसांची तनुही साची या० )

तत्व न सोडुनि सत्व राखिजे ऐशी शास्त्राज्ञा खरी ॥ नीच मनाला गमते माझ्या निशिदिनि बाळा-
खरीबरी ॥ बाळा ऐसा समज धरी ॥ ध्रु० ॥ संसा-

---

१ शंकरपदकमल. २ प्रसाद. ३ पाण्याशिवाय. ४ स्नान. ५ दूध. ६ कांचोळी.
७ पृथ्वीपती. ८ मूल. ९ शास्त्राज्ञा. १० वाटतें. ११ रात्रंदिवस.

शंतिल स्करव दुःखाची पडुन काय फळ पदीं बिडी ॥ पुत्रधनाला बसला घसरा पहिलो साची मर्त्यकुडी ॥ भलाजन्म हा तुला लाधला जाउनि हरिच्या पदा धरी ॥ केले नाना नवस स्करांना कारण ह्वावा पुत्रोदरीं ॥ धरू नको तूं आशा माझी स्वर्गलो किंवी वस्तिबरी ॥ निर्दय माता पुत्र वधी हें खापर फुटलें माझे शिरीं ॥ परित्या दुःखानाणि मनीं मी वदनो अनिथी सत्वहरी ॥ ह्मणूनमन हें कठोर केलें निपट वासेव वज्र परी ॥ जगजेठीच्या- भेटी स्तवतूं थेट वाटती नीटधरी ॥ कैलासीच्यापेठीं जाया धीट होउनी विट टाकुनी जाईलो करी ॥ १ ॥ नल नसोडुनि सत्व राखिजे ऐशी शास्त्रा ० ॥

ओंव्या.

सत्यसत्वाचे उखळीं ॥ करीं धरोनियां मुसळी ॥ शिर- कांडितसे होवेल्हाळी ॥ अचेल धैर्य धरोनियां ॥ १ ॥ चिलिया करी वैकुंठ वास ॥ पूजावया थ शंकरास ॥ के व्हां पाहीन मी त्यास ॥ प्रसन्नचित्तें करूनियां ॥ २ ॥- बालक माझें चिलिया तान्हें ॥ झालें परलोकींचें पाहु णें ॥ नाकीं अचलशिवदर्शनें ॥ राहील आतां सानंद ॥ ३ ॥ जन्म घेउनी माझे उदरीं ॥ सेवावया तो मदनारी ॥ जासी दीनाचा कैवारी ॥ तोच साच बालका ॥ ४ ॥ मं- गलगीत मी गाइले ॥ सत्वासाठीं गे माउले ॥ नेत्रीं अ- श्रू नाणिले ॥ अनिथीच्या आज्ञेपरी ॥ ५ ॥

मणिबंध वृत्त.

पक्व करितें हें शिर मी होउन कांहीं नाशरमी ॥
तृप्तचि होतां हा अनिथी मानिन आनंदा मी कथीं ॥ १

( इतकें झाल्यावर. )

---

१ मृत पावणारी. २ टणक. ३ इंद्र ४ कंटाळा. ५ स्थीर. ६ आनंद. ७ सेवक. — ८ शंकर.

चांगुणा:- हे अंतर साक्षमहाराजा, आपले आज्ञेनुसार मत्तनय शिर कमल आपल्या समक्ष मंगलगीत गाऊन कंडण केलें आणि तें परिपक्व करून सिद्ध केले आहे. करूणा घना, दीनोद्धारणा आतां निःशंकपणें हें ग्रहण करावें. ( अतिथीचें यथासांग पूजन करून सुवर्णाचे ताटांत मांस घालून त्याच्या पुढें ठेविते. )

अतिथी:- हे राजन् अवनीपते, तुह्मी उभयतां माझे पंक्तीस भोजनास आले पाहिजे.

राजा:- प्राणप्रिये, प्रियपुत्र मांस भोजनार्थ आपल्यास पाचारण झालें आतां मला कसें वाटतें हें सांगवत नाहीं. येथ पर्यंत मी आपलें मन स्वाधीन ठेविलें, परंतु आतां पुढील व्यवहार करण्यास कसा धजूं. ( नेत्रांतून अश्रुधारा वाहतात. )

चांगुणा:- प्राणवल्लभा, यासमयीं मनांत कोणतीही चिंता न चिंतितां अतिथीस विन्मुख जाऊं देऊं नये. मी आपल्या निलयास मभोदरांत नवमास धारण केला त्यापेक्षां पोटचा पुत्र पोटीं घालण्यास कायचिंता आहे? सत्वरक्षणार्थ जीवात्म्याचें विसर्जन होई पर्यंत मागें घ्यावयाचेंच नाहीं, असा दृढ संकल्प असतां मनीं विकल्प कां कल्पावा. प्राणनाथ, मी आपल्यास विशेष सांगावें असें नाहीं

राजा:- बरें तर प्राणप्रिये मी तसें करण्यास सिद्ध आहें.

राजा व चांगुणा:- स्वामिराज, हे आह्मीं पंक्तीस आलों. ( जाऊन बसतात ) आह्मीं आपले चरणकमल दास्यत्वांत तत्पर आहोंत. स्वस्थ मानसें करून इच्छित भोजन ग्रहण करावें ह्मणजे आपल्या अनुग्रहें करून आमची सत्वरक्षण इच्छा परिपूर्ण होईल.

अतिथी:- ( पात्रावरून उठून ) अरे राजा मीं कधींही तुझ्या पंक्तीस भोजन करणार नाहीं. कारण.

ओंव्या.

जैसें बुबुळावीण नयन ॥ कीं दीपावीण[1] शून्यसदन ॥
तैसें पुत्रावीण रंजन ॥ निरर्थ होती आलोकीं ॥ १ ॥

---

१ गृह.

निपुत्रिक जनाचें वदन॥ पाहातो ना कोणी ही जन॥
मग कैसें मी घेऊं भोजन॥ तुझ्या गृहीं ज्मणपा॥२॥

राजा:— (सद्गदित होऊन.) प्राणेश्वरी, जगन्नियंत्या परमेश्वरा-च्या अनुग्रहें करून आपणास चिलया नामक दिव्य पुत्र रत्न प्राप्त झालें तें ही पाषाणावत् कठोर मन करून सत्व रक्षणार्थ या स्वामिराचा चरणार विंदीं अर्पण केलें असतां त्याचा स्वीकार न करितां नि-पुत्रिक पणाचा आपल्यावरती आणखी उलटा दोष ठेवून ते सत्वहरण करून जात आहेत त्या पेक्षां हा दुष्ट प्राण नष्ट होईल तर उत्कृष्ट असें स्पष्ट सांगतों.

चांगुणा:— अहो प्राणनाथ, असें भलतेंच काय बोलावें कांहीं न-रीं विचार करून हें भाषण निघालें आहे काय? आपलें शांतवन करण्यास या प्रसंगीं मी तरी समर्थ आहें काय, आतां इतकीच विनंती आहे कीं, क्षणभर धीर धरून मजवर दृष्ट द्या.

चांगुणा:— (गहिंवरून) हे दीन दयाळा स्वामिराजा, आतां आ-म्हा दीन जनांना कितीतरी सत्वांत पाहाण्याचा सिद्धांत केला आ-हे हें धादांत स्पष्ट सांगा.

(ईश्वरास आठवून.)

साक्या.

शिवशिव शंकर करुणाकर हर धांव संकटीं आतां॥
दुःखविमर्दा[1] तुजविण आम्हा कोणि नसे गात्राता[2]
भक्तवत्सला दुर्दैवानें केला आमुचा घाला॥
धाउन येउन सत्वर तारीं आम्हा दीन जनाला॥ २
सत्व न जावें म्हणून मी गा करीं बाळका मारीं॥॥
अनिश्री[3] आतां बोल ठेविती कायकरूं कामारी॥३
अनुग्रहानें तुझ्या शंभो बाळक सुंदर मूर्ती॥
प्राप्त जाहली काय परी गा मळली आमुची कीर्ती[4]

१ दुःख नाशना. २ संरक्षणकर्ता. ३ शंकर. ४ रूपेनें.

धांवउमापति दुःखमला अति नसोसवे हे कांहीं ॥
अचिंत्यसंकट प्राप्तजाहलें यदर्थतुजमी बाही ५
स्पष्ट इष्टसुत नष्टजाहला दुष्टचांगुणा स्पष्ट ॥
धष्टपुष्टहा कायकाथव्या करुंहिदुर्धर गोष्ट ॥ ६
धर्मसोडुनी चर्मकाटिलें केला सुतदेहांत ॥
क्रूरकर्म हें वर्म भेदितें मर्मनसे देहांत ॥ ७ ॥
नत्वजाउनी सत्वहि गेलें दुःखदवी ही हरणी ॥
सांपडलीतूं मुक्त करावी ऐशी करुणा करुणी ॥ ८ ॥
चित्रपुत्रमी विचित्र वधिला झाल्यें दुरितापात्र ॥
चैनपडेना मित्र असेमज बालक दुःखचरीत्र ॥ ९
अनंगकांती अभंग हरिसा बालकसुरंगरंग ॥
होता गेला संगसोडुनी होईमनाचा भंग ॥ १० ॥

श्लोक (शिखरिणी वृत्त.)

कदा बाळा दावी वदन कमळा सुंदरवरा ॥
कदा भेटी देशी सकल मन हें राजकुमरा ॥
तुझ्या छंदीं लागे त्वरितसखया येई मजला ॥
धरापृष्ठीं नाहीं तुजसम असा बाळदिसला १
अहा बाळा केलें कठिण मन वज्रापरिजरी ॥
तुझा प्रेमा त्यातें त्वरितं शिकवी चूर्ण विकरी ॥
अतां माझ्यापोटीं पडधरुकरीनें विसरवा ॥
नयासांगू जातां मज्जन वदवे यानिं समया २
वियोगाग्नीसाची ज्वलन करितो काय आमुचा ॥
सख्याबाळायेरे किति विनवूं लेख विधिचा ॥
पडे भाळीं माझ्या अनल समजो नापदमला ॥
असे आक्रोशानें कितिनरिं करूं जीवदमला ३

---

१ चिंताक्रांत २ उत्तम ३ पुत्र ४ प्राणगत ५ कठीण ६ कानडें ७ मूळबीज. ८ वड वाग्नीन. ९ पातक १० मदन ११ सुवर्ण. १२ हिरमोड. १३ सुंदररूजातो १४ बालक. १५ दग्ध

बये अंबे माते शरण मि असें घालि पदरीं ॥
दिनाच्या अन्याया तुजविण मला रक्षण करी ॥
असे कोणी नाही अभय वरदे सांग न तुला ॥
चिलिया बाळाची लवकर घडो भेट मजला ॥ ४

आर्या.

रडुण आठवुनी मम होतो बासह्न दीन हा कंठ ॥
काय करूं मी बाळा नारक आतां खराच शिनिकंठ

पद.

काय करूं मी कोठें जाऊं ॥ किति तरि धैर्य धरुनी राहूं ॥ बाळक मजला टाकुनि गेला ॥ आतां त्याला कोणिकडे पाहूं ॥ काय करूं० ॥ ध्रु० ॥ येईल केव्हां कळे नाहें मजला ॥ वाट तयाची कुठवर पाहूं ॥ का० ॥ रत्नकरानिल दुर्दैवानें ॥ गेलें न याला कैसें मी पाहूं ॥ काय करूं० ॥ अतितर मजला दुःख हें वाटे ॥ कितितरि ह्रदयीं शोक मी साहूं ॥ कायकरूं० ॥ चैन पडेना तुजविण बाळा ॥ अग्नि न आतां जाळुन घेऊं ॥ काय करूं मी कोठें जाऊं० ॥

(असा अनेक प्रकारें विलाप करीत असतां श्रियाळ राजाच्या कंठीं हटमिठी घालून ह्मणत्ये.)

चांगुणा.— प्राणवल्लभा प्राणेश्वरा (सद्गदीन होऊन) आतां हा दुःखाब्धी भरित जडरूपी देह या क्षितितलावर केवळ व्यर्थ भार आहे तस्मात् प्राणनाथ या दुष्टपापिणीनें अग्निप्रवेश करण्याचा निश्चय केला आहे त्यास आपली आज्ञा असावी आतां हें मलिनमुख जनांत मी कसें दाखवूं (धरणीवर पडते आणि ह्मणते) आई धरणी माते मला तूं सत्वर आपले पोटांत घाल. हे ईश्वरा जगन्निवासा कोठवर तरीं अंत पाहातोस हें दुःखतर सहनच होत नाहीं. यमदूत को-

---

१ शंकर. २ दुःख.

णी कडे गेले त्यांनीं मलासत्वर न्यावें नाहीं पेक्षां मी आत्महत्या-
करून घेईन माझें तान्हें पाडस गेलें. इतकेंहीहोऊन सर्वजनांत
पुत्रवधाचा आणि निपुत्रिकपणाचा कलंक लागला यासर्व वांचू
न काय करावयाचें आहे. (डोकें फोडून निचेष्ट पडते.)
राजा.— अगे हे प्राणप्रिये असें गे तूं काय करितेस क्षणभर धै-
र्य धरून इकडे अवलोकन कर. थोडेंसें मी कांहीं सांगतों तें ऐक
(तिच्या मानेखाळीं हात घालून तिला मांडीवर घेतो.) हे मम प्राणे
श्वरी त्वां माझा शब्द कधीं ही मोडिला नाहींस आणि आतां मोडि
तेसना ? शिवशिव!! अगे प्राणसखे, एकवार शुद्धीवर येऊन इ-
कडे पहा (नेत्रकिंचित् उघडे करून पहाते) प्राणवल्लभे अतिथी
नें जेव्हां नरमांसाची गोष्ट काढिली तेव्हां मी आधींच कीं विचार घेत
ला त्वां यासव व ज्या परीस कठिण हृदय करून धैर्य पर्वत होऊन
सत्व रक्षणार्थ माझे वचनास अनुकूल झालीस व सर्व अघोर प्र-
कार ही अतिथीच्या आज्ञे अन्वयें केला (नेत्रांतून अश्रुधारा लोट
चालतो) माझ्या सकुमार बालकाचें शिरकमळ आपणास पहाव
यास ठेविलेंस तेही या स्वामिराजानीं अंतर साक्षपणें जाणून ब-
हून कोपायमान होत्साते सत्व घेऊन चालले तेव्हां तूं किती किती
संबोधून अतिथीरायाचें मन वळविलेंस व शिरकमळ कंदनका-
ळीं ही किती समाधान करून घेऊन त्यांचें ह्मणणें शेवटास नेलेंस
सर्वदुःख विसरून मागें पुढें न पाहतां आपण त्यांच्या पंक्तीस ही
प्रत्यक्ष पुत्रमांस भक्षणार्थ बसलों यासर्व कृत्याचा भाव मनापा
सून इतकाच कीं, अतिथीस विन्मुख जाऊं नदेतां सत्व रक्षण व्हावें
परंतू हें सर्व झाल्यावर आतां महाराज स्वामिराज शास्त्रांतील-
वचनें प्रमाणें देऊन " निपुत्रिकाचें वदन ही पाहूं नये मग अन्नग्रह
ण कोठचें " असा दोष ठेवून उठून आपला धिक्कार करितात, प्रा-
णेश्वरी इतकी व्याकुळ होऊनकीं शेवटचा एक उपाय राहिला आ
हे तेवढा करून पाहूं नाहींतर देहाचा अंत करण्याचा विचार करूं
सखे अमळ नीट बैस (उठून बसते) आपलें हें सत्वरक्षणार्थ अ

लौकिक अप्रतीम दुर्घट कृत्य पाहून सर्व भूमंडळावर अबाल वृ-
द्ध आपले मनांत जागचे जागीं चूर होऊन गेले आहेत, खरेंच गी आ-
पण कोणास किमपीही कधी दुःख दिलें नाहीं. आणि ईश्वर सेवेंत-
अंतर ही केलें नाहीं याचा परिणाम असा दुःखदायक होऊं लागला-
तर त्याचा दोष आपले कडे काय आहे? आपण करूं नये तें केलें-
सर्व परमात्मा श्री शंकर सर्वांतर्यामि खें करून जाणतच आहे
सखे हें पहा व्योमपटीं सकळ सुर वृंद हा चमत्कार अवलोकन क-
रीत आहेत. आणि तुह्मी " धन्य धन्य आहांत " अशी अमृत वा-
णीनें स्तुती करीत आहेत. (चांगुणा आकाशाकडे पाहून विस्मित
होते) तस्मात् मला एक विचार सूचला आहे तो श्रवण कर.

चांगुणा:- प्राणनाथा, अतिदुःखकारीत प्रज्वलीत अग्नि शांत हो-
ईल असा कोणता विचार आपले मनांत आला आहे तो श्रवण कर
ण्याकडे अत्युत्कंठ उत्कंठा प्राप्त होऊन माझें मन चातकाचे परी ला-
गलें आहे.

राजा:- प्राणवल्लभे सांगतों हें स्वस्थ मानसें करून श्रवण कर.

आर्या.

दासाचा हितकारी निशिदिनि सुरपती असे तयाशरण॥
जाऊं संकट हरुनी करिल कृपा तो चिरे उमारमण ॥१ ॥
सृष्टिस्थितिलय कर्ता प्रभु जो परिस नि विलाप हे कानीं ॥
येइल सत्वर धाउनि पाहिल दीना कृपाकटाक्षानीं ॥ २॥
भावें बंभेर होउनी जाऊं पशुपति पदारविंदांत ॥ ॥
मधुमाधुर्याचि रुची सेवुं होऊं मनांत गे शांत ॥ ३॥
सत्वाराखिल तो ची मृत्युंजय हें असे तयानांव ॥
दुःखार्णवि बुडतांना तारी जगदीश पाणि हा नांव ॥ ४॥
आपण अनन्यभावें जावें या अतिथिलाच गे शरण ॥ ॥
तो चि कृपाघन वळुनी आपुलें सत्वर करील उद्धरण ॥ ५॥

---

१ रात्रंदिवस. २ शंकर. ३ आक्रोश. ४ दयार्द्र दृष्टीनें. ५ भंग. ६ पदकमलांत
७ दुःखाब्धी. ८ एक.

चांगुणा:- प्राणप्रिया, आपल्या ह्मणण्या प्रमाणें कां होईना न- सें आणखी एकवार करून पाहूं पण प्राणसख्या हा शेवटला उपा- य आहे जगदुद्धारकास आपली दया येऊन तो सर्व संकटाचें दूरी- करण करून आपणास धन्य करील तो सुदीन दिवस होईल.

राजा:- अगे प्रियसखे, करुणाकर प्रभूनें प्राणजाई पर्यंत ही अंत पाहिला आपण आपलीच मान त्याच्या चरणावर ठेवि- ली आहे तेव्हां रक्षण करणें न करणें हें त्याच्या कडेसच आहे- आपणा कडे काय आहे? आपण या महाराजांचे चरण कमल सोडूंच नये. मग त्यांस दया येऊन ते मुक्त करणार नाहींत असें- कसें होईल.

चांगुणा:- आपण सांगतां तें खरेंच आहे.

राजा व चांगुणा:- अहो महाराज स्वामिराज.

साक्या.

प्रियकर बालक [1]अर्पियला तरि अंत पाहतां काय॥
दयानिधे गा सत्वराखिजे आपण आमुची माय १
स्वामिराज मम सत्व हि जाउनि वंशा खंडणा झालें॥
पुत्रवदन मी नेत्र भरोनी नाहीं कधीं देखीलें २
व्यर्थचि गेला बालक माझा इच्छा तव नाहीं पुरली॥
स्वामिराज मी पापिण बारे कैसी मागें उरली ३
स्वामिराज तव आज्ञे परि मी सेवा नाहीं चुकलों॥
परि ही चिंता डोहिं बुडोनी सर्वस्वातें मुकलों ४
जननी जनक हि तूंच आमुचा सोडवि दुःखांतूनी॥
जाऊं नकां तुह्मी [2]निर्मख येथुनि दीना त्या सोडुनी ५

चांगुणा:- हे शिव कर्पूर गौरा ही दुःख पंकीं गुंतलेली धेनू तुजवांचून कोण बाहेर काढील? हे उमावरा, तुला आह्मी- अनन्यभावें करून शरण आलों आहोंत देवाधिदेवा, सर्वा-

---

१ समर्पण केला. २ प्रस्तुत.

पराधांची क्षमा करून रक्षण करणें आपले कडे आहे. असें अ-
नेक प्रकारें स्वामिराजास विनवीत आहे तों त्याच्या नेत्रांतून खं
रखळां अश्रू वाहूं लागतात.

विदूषक— कायहो सूत्रधार, हा राजा इतके संकटांत कांपड
ला आहे. मला वाटतें ह्याचा गला शाहाणा असून पुत्रशोकानें.
याची बुद्धी मंद होऊन गेली आहे.

सूत्रधार— तुझे भाषणांतील अर्थ मला कांहींच समजला-
नाहीं परंतु तुझी कांहीं दीर्घ शंका डोक्यांतून बाहेर पडावयाची
वेळ आली आहे असें मला वाटतें, बरें कशीकाय तुझी कल्पना
आहे ती एकदां मुख निर्गत करून दाखीव तर खरी तूं या रा-
जावर कोणता दोष ठेवितोस हें या सभाजन लोकांसतरी कळेल

विदूषक— अहो हा राजा पुत्र शोकानें अगदीं विव्हळ होऊन-
गेला आहे. परंतु आपले राजास जें संकट प्राप्त झालें आहे त्या-
चे निरसनाचा विचार त्याचे प्रधान वर्गांनी तरीं कांहीं करावयाचा
होता परंतु तेही मंदमती होऊन जसे गुजराथी लोकांच्या मढ्या
स भाड्याचे रडणारे लावतात तसे हे संपूर्ण राजसेवक आपआ-
पले शक्ती प्रमाणें राजास रडण्याची मदत करीत कपाळास हा-
त लावून बसले आहेत. तसेंच या प्रधानस्त्रिया चांगुणा बाई
स ऊर बडवून रडण्याची मदत करीत आहेत. परंतु राजास आ-
लेल्या संकटाच्या परिहाराचा यत्न कोणीच कांहीं करीत नाहींत.

सूत्रधार— अरे बृहस्पतीच्या पूर्ण अवतारा तुझ्यामतें त्यानीं क-
रावें तरी काय?

विदूषक— अहो मला आपण ही राजाच्या प्रधान मंडळीतलेच
मंद बुद्धी दिसतां एवढा वेळ आपण तरीं कांहीं युक्ती काढाल म्ह
णून वाट पाहिली परंतु आपली कल्पना ही कांहीं चालत नाहीं.
यावरून तुह्मीं ही राजाच्या रडण्याचे सोमती दिसतां परंतु आ-
तां आमची तरीं विद्वत्ता ऐका. संपूर्ण सभाजन हो तुह्मीं ही मा-
झें बोलणें श्रवण करून तुह्मास खरें वाटेल तसें या राजास व-

आमचा सूत्रधार बोवाजीस आपलें अनुमन द्या (इतकें बोलून स्वस्थ बसतो.)

सूत्रधार.— अहो गोमाजी कापशे सर्वांची निंदा करून शेवटीं तुमचे तोंडांतून काय अक्षरें निघतात, तीं ऐकण्या करितां सर्व सभासद उत्कंठित होऊन राहिले आहेत, आणि तूंतर शेवटीं गुडघ्यांत डोकें अडकवून भूमी देवीचें चिंतन करीत बसला आहेस, तर, जें काय बोलावयाचें असेल तें लौकर बोल.

विदूषक.— अहो संकट आलें असतां तें युक्तीच्या वाटेनें निरसन करावें हें बुद्धिमंताचें काम आहे. पहा त्या अतिथीनें त्या बिचाऱ्या भोळ्या राजास महत्संकटांत घालून शेवटीं त्याचें सत्व हरण करून चालला आहे याचें कारण पाहिलें असतां अगदींच थोडें आहे. तें राजा निपुत्रिक हेंच परंतु यास थोडी युक्ती आहे. त्या राजाच्या मांडीवर तुझ्या किंवा माझ्या सारख्या अक्कलवंताचें जरी दत्तविधान करून त्याला सपुत्र केलें असतें तरी यावेळेस त्या अतिथीस उठून जाण्याला मार्ग नाहींसा होऊन राजाचें संकट क्षणार्धांत नाहींसें झालें असतें. का सूत्र धार आमच्या सारखा अकलेचा खंदक या राजा जवळ एकतरीं प्रधान मुत्सद्दी आहे काय ? परंतु " यथा राजा तथा प्रजा " या ह्मणी प्रमाणें या राजा बरोबर जवळचे संपूर्ण राजसेवक गुडघ्यांत डोकें अडकवून पहा कसे रडत बसले आहेत हें मी तुह्मास खुणेनें दाखविलें तें तुह्मीं न समजून मलाच ह्मणतां भूमी देवीचें चिंतन करितोस आतां पहा मी चिंतन करितों कीं कोण चिंतन करितो तें.

सूत्रधार. वाहावारे वाहावा तुला या वेळेस बृहस्पती ह्मटलें तरी चालेल पण स्वर्गस्थ वासी जे सुरगण ते मात्र तुला अभ्युत्थान व हविर्भाग देऊं देणार नाहींत मात्र या मृत्यु भूमी वरील थेटर खंदांनला बृहस्पती तूं खरा.

विदूषक.— द्या तरमग आतां मला शाबासकी द्या. आणि या राजाचें संकट निवारण करून मला मुख्य प्रधानाचीं वस्त्रें देववा,

ह्मणजे मी तुह्मांस नाटक करण्याची सुपारी देवविती.
सूत्रधार — तूं ह्मणतोस तसें ही होईल पण त्यांतील वर्म तुला माहीत नाहीं. आलीकडे राजे लोकांनीं अनीतीनें नानाप्रकारच्या कानू काढून लोकांचें द्रव्य हरण करण्याची इच्छा धरली आहे यामुळें प्रजेनें तदनुसार दत्तविधानाची नवी युक्ती काढून राजास ठकवूं लागले आहेत ही आलीकडील रीती तुला माहीत आहे परंतु दत्तविधानें करून जो पुत्र झाला तो मानसपुत्र समजावयाचा ह्मणून त्यायोगानें प्राणी सपुत्र होऊन स्वर्गास जात नाहीं. नाहीं तर तुझ्यामतें या सत्वधीर राजाच्या पदरीं महान् महान् विद्वान् पंडित का थोडे आहेत पण त्या वेळेस राजे सत्वधीर असल्यामुळें त्यांस परद्रव्य अभिलाषाची बुद्धीच नवती. ह्मणून दत्तविधानाची युक्तीच निघाली नवती
विदूषक — तुमचे बोलण्यावरून आलीकडील चालीप्रमाणें दत्तपुत्र घेतल्यानें सपुत्र होतेतर एखादे स्त्रीचा भर्ता मरण पावला असतां ती अनाथ होते ह्मणून तिनें एखादा मानसपती केला तर ती सनाथ होईल कीं नाहीं.
सूत्रधार — मानसपती केल्यानें तिला दुष्कर्माचा कलंक लागतो तसा दत्तपुत्र घेतल्यानें कलंक लागत नाहीं परंतु दोहोंची साम्यता सारखीच.
विदूषक — कायहो सूत्रधार तुह्मीं हें बोलणें कोठून आणलें कोण जाणे एखादी निपुत्रीक वेश्या मरण पावली असतां तिचें और्ध्वदेहीक कर्म करण्यास जसा भाड्याचा पुत्र ( वारसपुत्र अथवा धर्मपुत्र करून तो अंत्यष्टी विधी पार पाडतात मग हा राजा दत्तपुत्र घेतल्यावर पुत्रवान् का बरें होणार नाहीं यावरून तुह्मीं दयाशून्य आहांत असें मला वाटतें.
सूत्रधार — अरे वेड्या आह्मास पुष्कळ दया येते परंतु त्याचा उपयोग कोणता दत्तपुत्र घेणें ही अज्ञान मनुष्याची समज आहे, श्रियाळ राजाच्या आलीकडे सूर्यवंशांत दशरथ राजा होऊन गेला.

त्याला पुत्र नवता ह्मणून त्यानें पुत्र कामेष्टी यज्ञ केला. तसाच अश्वपती राजास पुत्र नसल्या मुळें त्यानें ही पुत्र कामेष्टी यज्ञ केला आणि नाना प्रकारच्या उपासना व तपश्चर्या केल्या जर त्यावेळेस दत्त पुत्र घेण्याची वहिवाट असती तर या राजानीं इतके प्रयत्न कांकेले असते त्यांजला काय दत्तक पुत्र मिळत नवते पहा, जावेळेस यक्षानें धर्मराजाचे चार बंधू मारून टाकिले तेव्हां धर्मराजा बंधूचे शोधार्थ गेला ते समयीं यक्षाचे प्रश्नाचीं उत्तरें यथा योग्य दिल्या वर यक्ष प्रसन्न होऊन धर्माची परीक्षा पहाण्या करितां ह्मणाला तुझा एक बंधू उठवितो तो कोणता उठवूं हें सांग त्यावेळेस धर्माचे सहोदर बंधू भीम, अर्जून, पडले असतां धर्मानें नकुल सहदेव या दोघांतून कोणास ही उठवावें असें यक्षास सांगितलें तें ऐकून यक्ष धर्मास बोलला तुझे दोन बंधू सहोदर पडले असतां त्यांतून कोणासही उठविण्यास सांगत नाहींस आणि माद्रीसुत हे तुझे सापत्न बंधू असोन त्यांतून एकास उठविण्या विषयीं तूं विनंती केलीस याचें कारण काय? त्यासमयीं धर्म यक्षास ह्मणाला माझ्या दोन मातोश्री आहेत त्यांतून कुंतीचा मी आहें माद्रीचा एक उठविला असतां दोघीं मातोश्रींस स्वर्गप्राप्ती होईल नाहींतर माझे सापत्न माद्रीमातोश्रीस निपुत्रिक पणा मुळें स्वर्गप्राप्ती होणार नाहीं हें ऐकून यक्षानें चौघेही बंधू उठविले आणि धर्माचें समाधान केलें. तात्पर्य निपुत्रिकास स्वर्ग व मोक्ष नाहीं ह्मणून लोक पुत्र प्राप्तीची इच्छा करितात, दत्तक पुत्र घेतल्यानें तो प्राणी पुत्रवंताची साम्यता पावत नाहीं फक्त द्रव्यवान् लोक द्रव्यार्थ अथवा लौकिकार्थ दत्तक घेतात. पहा एखादा दरिद्री दत्तक घेऊं ह्मणेल तर त्यास तो कां मिळत नाहीं यावरून काय दरिद्याचा वंश वाढूं नये? असें आहे तर दत्तपुत्र ह्मणजे जसें एखादें वेश्ये जवळ द्रव्य पुष्कळ असतें व तिचा अंतकाळ आला ह्मणजे कोणास तरीं द्रव्याचें वारसपत्र देऊन द्रव्याचा मालक करिते त्याप्रमाणेंच हे दत्त पुत्र आहेत. हे पुत्र श्राद्धादि कर्में करितात पण त्यांत कांहीं अर्थ नाहीं ही भिक्ष

कांची लोकांस ठकवून पोट भरण्याची एक युक्ती आहे परंतु स्व- वीर्यापासून धर्मपत्नीचे ठायीं जो उत्पन्न झाला तोच पुत्र खरा बा- कीचे पुत्र द्रव्य पुत्र होत.

ही भाषणें अतिथीनें श्रवण करून त्याजला ही अतिशय ग- हिंवर आला आणि दयार्द्र वृत्तीनें बोलतो.

**अतिथी.**— हे महा पतिव्रते धराधीशे राजभामिनी, हींतर सारीं तूं तीनच पात्रें मांडलीं आहेस आणखी एक चवथें मांड तें तुमचा प्रियकर चिलया बाळास पाहिजे.

## प्रवेश ५ वा.

स्थळ (भोजन समारंभ.)

पात्रें.

श्रियाळ. चांगुणा. चिलया. श्रीशंकर.



चांगुणाः— ( विस्मित होऊन ) स्वामिराज चिलया बाळाची दशा तर प्रत्यक्ष आपण अवलोकन केलीत. आणि हें काय ह्मणतां.

अतिथीः— हे महापतिव्रते चांगुणे माता पित्यानीं बालका वांचून भोजनास बसावें हें उचित नाहीं या करितां तूं त्यास मोठ्यानें हांक मार.

चांगुणाः— हे प्राणसख्या असें अमृतप्राय आनंद दायक वचन यांचे मुखांतून निघतें त्या पेक्षां हा अतिथी नसावा कोणी तरी देवच असेल अस्तु काय सांगावें ईश्वराची करणी अगाध आहे. तस्मात् बालकास हांक मारून पहातें माझें नशीब श्री शंकरास उघडावयाचें नसेल कशावरून अहाहा असा आनंदाचा समय आज प्राप्त होईल काय ?

दिंडी

येईं येईं चीलया अरे बाळा गुंतलासी कोणत्या बरें खेळा ॥ अतिथि ने घे तुजवीण मुखीं ग्रास ॥ तुझ्या विषयीं लागला मनीं ध्यास ॥ १ ॥ नयेतां तूं त्यागीन मम प्राणा ॥ सत्वराखावें बालकास जाणा ॥ येईं येईं माझिया गुणागारा ॥ तूंच असती आमुचा अ सूसारा ॥ २ ॥ ॥ ॥

( अशा रीतीनें उच्चस्वरें करून हांक मारितांच चिलया असा आला. )

आर्या.

पवनजवा[1] परि आला धांउनि चिल्हाळ तो धरी पदर[2] मातेचा तें मोदित[3] झाला दारेसहीत भूपवर ॥ १ ॥

चिलयाः— हे स्वामिराज तवचरणाप्रत वंदन करितों. मातोश्री तुला अनंत कोटी नमस्कार करितों. हे ममताता स्नेहाळा तुमचा चरणाप्रत वंदन करितों मी आपल्या खेळगड्यां सहवर्तमान-

१ वायू. २ वेग. ३ हर्षित.

आनंदपुरींत खेळत असतां मला कशाकरितां हांक मारिली-काय आज्ञा आहे मी सेवेंत तत्पर आहें.

राजा व चांगुणा.- (आनंदाश्रू येऊन) अहाहा हे प्रियकर बालका तूं आमचा उदरीं येऊन धन्य केलेंस (मुखचुंबन करितात.)

अतिथी.- चिलया इकडे ये बैस (त्याचे मांडीवर बसतो.)

राजा व चांगुणा.- (अतिथीचे चरणावर लोळून.) अहाहा स्वामिराजा तूं धन्य आहेस असें ह्मणून असें करितात.

श्लोक.

गडबडां चरणावरि लोळती ॥ अतिथिच्या मनि-
तोषित तें अति ॥ ह्मणतिकीं अजि रत्न आह्मां दि-
लें ॥ सदय होउनी सत्व हि रक्षिलें ॥ १ ॥ ॥

ओंवी.

जरी अनंत जन्म पर्यंत ॥ करीजेली सेवा तुझी निश्चित ॥
तरीं या उपकाराचा अंत ॥ होणेच नाहीं स्वामिराजा ॥ १

अतिथी.- हे नृपश्रेष्ठा अगे हे महापतिव्रते चांगुणे मी तुमचें सत्व पाहाण्याकरितांच अतिथी रूप धारण करून येथें आलों तुह्मीं उभयतां माझे पूर्ण भक्त आहांत. खरे सत्य भक्त प्रतिपालक असा जो त्रिजगदाधिपती ज्यास श्री शंकर असें ह्मणतात तो च मी येथें प्रत्यक्ष प्राप्त झालों आहें हें माझें दिव्य सगुण स्वरूप अवलोकन कर. मी तुह्मा विषयीं पूर्ण प्रसन्न आहें.

राजा व चांगुणा.- (दिव्यस्वरूपाकडे पाहतात.)

साकी.

पंचवक्त्र तनु कांति सोज्वळ त्रिनेत्र दशभुजज्यांचे
अंबुज सदृश चरण करामधि परशु तेंशिव सांचे ॥ १ ॥

अहाहा (प्रेमाश्रू येतात) हे देवाधिदेवा श्री शंकरा तुझी-सच्चिदानंद सगुण स्वमूर्ती या चर्म चक्षूंनी अवलोकन करून.

---

१ दयायुक्त. २ वदन. ३ उज्वळ निर्मळ. ४ कमळ.

मानसाचे ठायीं अनुपमेय आल्हाद प्राप्त झाला. आहे. आह्मां स निपुत्रीक पणाचा लागलेला कलंक आपण धुवून टाकून सत्व रक्षण करून या जगांत धन्य केलें.
श्रीशंकर.- हे महापतिव्रते चांगुणे, हे नृपश्रेष्ठा श्रियाळा तुमचे मानसाचे ठायीं तुह्मांस जें काय प्रिय असेल तें मागा मी तुह्मांस पूर्ण प्रसन्न आहें.
राजा व चांगुणा.- हे शिव कर्पूर गौरा, दीन दयाळा श्री शंकरा, आतां हेंच वरदान मागतों कीं, आह्मास ओट घट केचे राज्य करून देऊन या नगरी सहवर्तमान आमचा उद्धार करावा.
श्रीशंकर.- हे सगुणराशी चांगुणे, हे धराधीशा, श्रीयाळा तुह्मीं मागितलें हें मी प्रसन्न चित्तें करून तुह्मांस वरदान दिलें आहे तर तुमचे इच्छे प्रमाणें घडेल.
विदूषक.- कां सूत्रधारा, अरे हें रे काय विलक्षण घडलें इतक्यांत हा अतिथी कसा दिसत होता एवढा वेळ याच्या अंगाची दुर्गंधी येत होती अंगावर माशा भणभण करीत होत्या अशी गलिच्छ व्यक्ती दिसत होती कीं, पाहतांच मनास त्रास यावा परंतु आतां हें देदीप्यमान् अनुपम्य मनोहर सतेज अवलोकन करून परम संतोष वाटतो प्रत्यक्ष ईश्वर दर्शन आपणास झालें ह्या आज अलभ्य लाभ मला आपल्या संगतीनें प्राप्त झाला, राजा व चांगुणा हे उत्सव दाते विमानीं बसून स्वर्ग लोकीं चिरकाल निजानंद भोगावयास जाणार असें दिसतें. हें रत्न खचित परम देदीप्य मान स्वर्गाहून गमन मार्गे विमान येत आहे वसकल नागरीक जन महत्प्रेमभरें करून पिपीलिकेच्या रांगाप्रमाणें राजवाड्या कडे धांवत येत आहेत. जिकडे तिकडे नृत्यगायन चालू झालें आहे. भेरी, दुंदुभी, तासे, मर्फे, नगारे, नौबती, घंटा, करणे, सनया, इत्यादि नानाविध एकसारखीं मंगल वाद्यें झडून राहिलींच आहेत. जिकडे तिकडे नारायणभट गोपाळभट, काकभट आनंदानें टणटणा उडत चालले आहे

त. तेव्हां कांहीं भोजन समारंभाचा थाट होणार आहे असें दि-सतें परंतु आमची कांहीं पोटपूजा होईल किंवा नाहीं कोणजा-णे या बडया प्रकर्णांत माझी गरिबाची कोठची दाद लागते व आ-मच्या हाताला कांहीं (दक्षिणा) हात लागतो किंवा नाहीं कोण-जाणे.

सूत्रधार:- अरे विदुषका, आतां या चिलया बाळास सिंहासनावर बसवून सचिवाचे हातीं राज्य सोंपून हें सर्व नगर उद्धरिलें जाणार.

## प्रवेश ६ वा.

स्थळ (राजगृह.)

पात्रें.

नागरीकजन, श्रियाळ, चांगुणा, चिलया, सचीव, शंकर भालदर. चोपदार.



विदूषक.– त्या एककुमार चिलयास सिंहासनावर बसवावयाचें ह्मणतोस तेव्हां येथें सिंह येणार काय तरमग मी आपला-येथून जीव घेऊन जातों माझीतर उंदीर खडबडला कीं प्राणाशीं गांठ येऊन पडते.

सूत्रधार.– वाहावारे वाहावा, अरे गृहस्था ही कोणी कडे तुझी कल्पना गेली सिंहासनावर बसवावयाचें ह्मणजे सिंहावर नाहीं त्यास राज्यावर बसवावयाचें.

विदूषक.– राज्य तर अगणीत कोस लांब रुंद आहे येवढ्या विस्तारा वर हें लहान मूल कसें बसेल बरें ? कदाचित आह्मीं त्याच्या राज्यांत राहातों. तेव्हां राज्यावर तें बसलें असतां आमचा तर चेंगरा व्हावयाचाना ? वाह्वारे ह्याच काय देव प्रसन्न झाला तो, आमच्यावरच येऊन बेतली बरें सूत्रधारा पुढें कसें करावें याची मसलत तरीं सांग आतां कसातरीं जीव बचावला पाहिजे.

सूत्रधार.– ( काय हा ब्राह्मण विना कारण अद्भुत कल्पना घेऊन काळजींत पडला आहे. ) अरे विदुषका, हें तूं मनांत अगदीं आणूंनको. पहातर खरें आतां कशी घनचक्कर मऊज उडून जाते ती आतां तुझी तर खूप चंगळ आहे.

विदूषक.– हूं तरमग उद्यां आतां हे राजश्री खूप हात मारून-घेतील त्या कामांत मी चांगला प्रवीण आहें.

( इतक्यांत. )

ब्रह्मवृंद.– राजाधिराजा तुजप्रत कल्याण असो.

राजा.– ( वंदन करून ) महाराज श्रीशंकराचे कृपें करून या-सद्गुण संपन्न चिलयास राज्यपदीं स्थापावयाचा सुदीन दिवस प्राप्त झाला आहे तर आपण कृपाकरून यथाशास्त्र चिलयास राज्याभिषेक करावा.

ब्रह्मवृंद.– राजा बरें आहे ( छत्रचामरादिक चिलयास अलंकृत करून मोठ्या थाटानें राज्याभिषेक करितात. )

राजा:- (मोठ्या आनंदानें.) सर्वांस गज, रथ, घोडे, असंख्यद्रव्य व वस्त्रालंकार वगैरे सर्व ब्राह्मणांस देतो.

चांगुणा:- (महा प्रेमानें) नागरीक स्त्रियांनों हें नानाविध अलंकार व वस्त्र भूषणें परिधान करा तुह्मीं सर्वांनीं मजवर कृपा असूं द्यावी.

राजा:- सचिवा सर्व ब्रह्मवृंदांस व सकल जनास भोजनार्थ आमंत्रण करावें.

सचीव:- आज्ञा महाराज (असें ह्मणून लागलीच सर्व तयारी करून आमंत्रणें करितो.

राजा व चांगुणा:- हे करुणा घना श्री शंकरा आपण सर्व ब्रह्मवृंदासह वर्तमान भोजन करण्या विषयीं कृपा करावी.

श्रीशंकर:- राजा तुझ्या भक्तीस्तव मी तूं ह्मणतोस त्याचा स्विकार करितों. मी भक्तिरूपानें सर्वांना बांधिला आहें (पंचपक्वान्न भोजनाचा थाट होतो.) राजा. आतां या दिव्य विमानीं स्त्रीसहवर्तमान् बैस.

राजा व चांगुणा:- बाळा चिलया एकवेळ चांगली भेट घेऊन मुखचुंबन करूं दे (मांडीवर घेऊन मुखचुंबन करितात.) बाळका तूं धन्य आहेस श्रीशंकरावर पूर्ण भरवसा ठेवून कुलधर्म व राजनीती यांस अनुसरून चांगलें राज्य कर. व सर्व जनाचें पुत्रवत् पालन कर. आणि कसाही प्रसंग आला तरीं सत्व रक्षण करण्यास मागें घेऊं नको आतां आह्मीं या दिव्य विमानारूढ होऊन कैलास नायकाचा रम्य नगराचे ठायीं श्री शंकर पदार विंदीं भृंगरूप होऊन निजानंदाचा अनुभव घेण्यास जातों

चिलिया:- हे मातुश्री, हे ममताना परम स्नेहाळा मी श्री शंकराच्या कृपें करून आपले आज्ञे प्रमाणें सर्व राज्य कारभार यथास्थीत चालवीन आपला आशीर्वाद पूर्ण असल्यानें सत्व रक्षण करून आनंदानें राज्य करीन आपली मजवर पूर्ण कृपा असावी.

राजा व चांगुणा:- हे महाचतुरा सचिवा, चिलया बाळास जीव लाऊन सांभाळावें आणि राज्य कारभार उत्तम रीतीनें करावा. त्यास अंतर देऊं नये व प्रजेला कोणत्याही प्रकारें दुःख न होईल असें वर्तन करावें.

सचीव:- हे राजाधिराज महाराज, आपल्या आज्ञेनुसार वर्तन करीन आपली आज्ञा मला शिरसा मान्य आहे.

राजा व चांगुणा:- सर्व कृपाळू जनानों, या त्या आनंद दायक दिव्य विमानीं बसा (सर्व बसतात.) सर्वांस आह्मीं नमस्कार करितों लोभ ठेवा. चिलया बाळाचा सांभाळ करून आनंदांत असा. आतां आह्मीं तुमचा निरोप घेतों. (इतक्यांत.)

साकी (विमानावर.)

व्योमघटांतुनि निर्जर करिती सुमने सुमन वृष्टी ॥
श्रीशिवशंकरलीलादेखुनि झाली तोषितसृष्टी १

सर्वांस आनंद होतो राजराजांचा जयजयकार असो असें ह्मणतात. विमान गगनमार्गें वर जातें जिकडे तिकडे आनंद सुखाची लूट होते

आर्या (ग्रंथाची समाप्ती.)

श्रीशंकरपदीं अर्पण करितों हा ग्रंथ बाळकृष्णासुत ॥
रावजि उपाभिधाने लेले ऐसें जनांत ह्मणतात ॥ १ ॥

ओवी.

शके सत्राशें नव्वदांत ॥ विभवाब्दी माघ शद्धांत ॥
बुधसप्तमीस हा समाप्त ॥ झाला ग्रंथ श्रीकृपें ॥ १ ॥

आर्या.

वाल्मिकपुरीं असतांना नारो आपाजि गोडबोल्यांनीं ॥
श्रियाळवृत्तनाटक ग्रंथ करा हें कळविलें त्यानीं ॥ १ ॥
त्याचें मन मज दिसतें रमतें कीं कायलोककल्याणीं ॥
ऐसें असता सौख्या पावेनातो कसा बरें प्राणी ॥ २ ॥

समाप्त.

श्री

दत्तात्रेयकृत.

# बभ्रुवाहन आख्यान.

अथवा

## पार्थपराजय.

# नाटक

हें

नविन पुस्तक.

मुंबईत.

बापु सदाशिव शेट शेट्ये हेगीष्टे

यांणीं

आपले

छापखान्यांत.

छापिलें

मिति ज्येष्ठ शुद्ध ४ मंदवार

शके १८०२ विक्र०

तारीख १२ माहे जून सन १८८० इसवी.



किंमत ॥. रुपया.

# प्रस्तावना.

आजपर्यंत नानाप्रकारचे विषय नाटक रूपानें प्रसिद्ध झालेले पाहण्यांत आल्या कारणानें पुरातन कथेपैकीं हा भारथीय विषय नाटक रूपानें रचला आहे. आतां यांत कविता भाषणें वगैरे जशीं असावीं तशीं नाहींत. असें जरी सूज्ञ म्हणतील तरी मला तें ऐकणें भाग आहे. कारण एकाच प्रकारच्या पुष्कळ वस्तु नित्य पाहण्यांत येत असल्यानें त्या वस्तू पाहण्याची फार गोडी रहात नाहीं. हें जरी खरें आहे तरीं माझी सर्व सुज्ञास अशी विनंती आहे कीं; सदरहू नाटकाच केवळ अव्हेरन करितां संग्रही ठेविल्यास आपला फार आभारी होईन. यांत चुक्या राहिल्या असतील त्याचा त्याग करून गुण ग्रहण करावे म्हणजे कृत कर्माची पूर्वता मानण्यास मला हरकत नाहीं.

पुस्तककर्ते.



# उपोद्‌घात

पूर्वी मणिपुर नगरांत बभ्रुवाहन नामक राजा राज्य करीत असतां धर्मानें पृथ्वी जिंकण्या करितां सोडलेला अश्व त्याच्या नगरांत आला. तेव्हां अश्वमस्तकावरील लेख पाहून बभ्रुवाहनानें युद्धाची तयारी केली. असतां त्याच्या मातुश्रीनें (चित्रांगीनें) त्याचा निषेध करून त्याला सांगितलें कीं, तो तुझा पिता आहे. यास्तव अश्व घेऊन त्याला शरण जा. व सन्मानानें नगरांत घेऊनये. नंतर बभ्रुवाहन मातेच्या सांगण्या प्रमाणें अर्जुनाला शरण गेला. असतां अर्जुनानें सांगितलें कीं, तूं माझा पुत्र नव्हेस. तर जारणीचा अससील. या प्रमाणें त्याची निंदा केली. तेव्हां त्यास क्रोध येऊन त्याणें पार्था बरोबर युद्ध करून त्यास रणांत पाडिलें. नंतर मातेच्या शोकानें खिन्न होऊन अर्जुनास उठविण्या करितां त्याणें शेष मस्तकींचा मणि आणिला. इतक्यांत हस्तनापुरीं कुंतीस अर्जुन मेल्याबद्दल स्वप्न पडलें. म्हणून ती भीम व कृष्णा यांस ह तेथें आली तों पार्थाचें व वृषकेताचें शीर नाहीं हें पाहून बभ्रुवाहन दुःखित झाला असतां कृष्णानें प्रतिज्ञा करून उभयतांचीं शिरें आणिलीं, व बभ्रुवाहना समक्ष अर्जुनास उठवून सर्वांस सुखी केलें.

# बभ्रुवाहनाख्यान

अथवा·

# पार्थपराजय·

# नाटक·

( मंगलाचरण· )

आर्या·

गजमुखपदारविंदा, नमुनिघेतों स्वहस्तिं हाग्रं
थ ॥ निर्विघ्न कार्य व्हावें, धरिला आहे मनें असा
हेत ॥ १ ॥ कमलाक्षे ब्रह्मसुते, तवचरणीं ली
नशारदे माते ॥ झालों मतिहिन किंकर, नाट्यर
चाया सुबुद्धि दे मातें ॥ २ ॥ ॥ साकी ॥ ॥ श्री
पादश्रीवल्लभस्वामी, नमितों मीं तबपाय ॥ रसिक
जनासीं तृप्तकराया, योग्य करीं हा काय ॥ ३ ॥

( सूत्रधार प्रवेश करितो· )

सूत्रधार· (आकाशाकडे पाहून·) आहाहा। भगवान् तारानायक आनंदित होऊन मध्यावर आल्या कारणानें चंद्रिकेच्या प्रकाशानें कित्येक विलासी क्रीडासक्त झाले आहेत· नाना प्रकारचीं पुष्पें विकसित होण्याचा समय प्राप्त झाल्या कारणानें सुगंधा सह वर्तमान वायु येऊन मनाला बहुत शांति देत आहे· मोठमोठे कवी, देवसभा, राजसभा, इत्यादिकांचीं वर्णनें करितात· परंतु त्या प्रत्येकांत एकाचें - थोरान्वें वर्णन करितात· सांप्रत या रम्य नाटकालयांत सर्व विद्वान

गजानना येरंगभूमिसि, संकटिं आहें आज ॥ नाट्यारंभा करिं परिव्हावें, निर्विघ्नें हें काज ॥ ४ ॥

पद

गजानना येरंगणिसत्वर संकटीं आहें तुझा किंकर ॥ ध्रु० ॥ जगत्रयींमीं त्वत्कीर्तिला ऐकुनि देवा तुज लास्तविला ॥ ध्रु० ॥ तवच्चरणीं मीठेउनि मानस आरंभिलें मत्कार्यास ॥ ध्रु० ॥ धुड धुड धुड धुड धांवत पायीं खुळखुळ घांगऱ्या वाजत येईं ॥ ध्रु० ॥ मूषक वाहना भावें तुजला नमितों माधव तारीं याला ॥ ध्रु० ॥ ५ ॥

( या प्रमाणें सूत्रधार स्तवनांत निमग्न असतां गणपती प्रवेश करीतात. )

गणपतिः आर्याः

होसावध मद्दासा, आलों मी तव सुभक्ती पाहोनी ॥
मागें मागें वांछित, पुरविन इच्छा समग्र वरदानीं ॥ १ ॥

सूत्रधार- (गणपती आला हें पाहून. )

साकीः

सत्कृत्यावरी विघ्नसमूहच, येउनियां पडताती ॥
यास्तव तुजवरि ठेवुनि निष्ठा, ध्यातों मंगलमूर्ती ॥ १ ॥

गणपतिः आर्याः

मत्करींचा फरशासदां, निवटितसे भक्त विघ्नशत्रूस ॥ न करीं चिंता कांहीं, जाईल निर्विघ्न कार्यसिद्धिस ॥ १ ॥

सूत्रधार- (कामदा) श्लोक-

अज्ञबालकें आर्यरंजना ॥ पावतीकसेविघ्नभ
जना ॥ फारवाटते भीतिअंतरीं ॥ घालनीस्त्व
रेंसूज्ञत्याकरी ॥ १ ॥

गण० आर्या-

वाग्देविप्रतिबाहीं, तीयेईल रंगणांतहर्षानें ॥
तिचियावरप्रदानें, तूंअपलेंसर्वकार्यअग्रानें ॥ १ ॥
जातोंमीशिवलोकीं, विजयोस्तूसर्वदांकरींका
व्य ॥ बाहीयेईनवेळीं, संकटपडल्यासबालकाभ-
व्या ॥ २ ॥

( गणपती निघून जातात )

सूत्र० (सरस्वतीची स्तुती) साक्या- (चाल दुसरी )

तुजलाध्यातीं विधिविष्णू ॥ मायेबाग्देवी ॥ ध्रु० ॥
वीणापुस्तक धरिणी-अंबेकमलोद्भवतनये य ॥
यासमयीं दीनातें तारक नाहीं कोणीमाय ॥ तु० ॥
॥ १ ॥ आदिशक्तितूंवाणितकरिमंडितनवारसांही ॥
याविणमातेमाझिइच्छादुसरीकाहींनाहीं ॥ तुज
लाध्या० ॥ २ ॥

(सरस्वती प्रवेश करित्ये)

माते हा दासानु दास चरणावर मस्तक ठेवित आहे

सरस्वती- बालका तुझें सदैव कल्याण असो-सूत्रधारा मी सत्यलोकीं पित्या
चे अग्रभागीं मयूरारूढ होऊन आनंदानें क्रीडा करीतु होत्ये- इतक्यांत तुझे क
रुणास्वर कर्णीं येतांच सीघ्र गतीनें यास्थळीं प्राप्त झाल्ये तर तुला संकट-

काय पडलें आहे तें सांग मी निवारण करून टाकित्यें.

सूत्र०- माते याठिकाणी मी विबुधरंजनार्थ नाटक करीत आहें परंतु नाटक पात्रें अज्ञान आहेत यांचे कडून उत्तम भाषणानें लोक रंजन होणार नाहीं. हें जाणून आपलें स्तवन केलें आहे. तर वर देऊन मला निर्भय करावें इतकीच विनंती आहे.

सरस्वती- वत्सा, तुझीं नाटक पात्रें सुरस वाग्विलासें करून सभाजनाचें मन रंजन करतील. हा माझा पूर्ण आशीर्वाद आहे. चिंता करूं नको. आतां मी स्वस्थानीं गमन करित्यें. ज्यावेळेस स्तोत्र करसील त्यावेळेस प्राप्त होऊन तुझे सर्व मनोरथ पूर्ण करीन. ( सरस्वती निघून जात्ये. )

विदू०- ( धांवत येतो. ) अहो सूत्रधार!

सूत्र०- कायरे विदूषका, असें वेड्या सारखें काय करतोस. काय झालें तुला.

विदू०- व्हायचे काय? पण एक असा खंद्या घोडा आला आहे कीं, जर या वेळेस मी पळालों नसतों तर त्याणें माझें पोटांत आपलीं शिंगें मारून फाडून टाकिलें असतें.

सूत्र०- अरे मूर्खा घोड्याला काय शिंगें असतात.

विदूष०- समजलों, तरतो ससा असेल नाहीं बरें.

सूत्र०- पटत मूर्ख म्हणतात तो तूं आहेस वेड्या सशाला तरी कोणीं शिंगें पाहिलीं आहेत काय.?

विदू०- एकून तो बोका असावा. असें म्हणाना.

सूत्र०- अरे बाबा, असा वायचळ त्या सारिखा बडबडूं नको तो घोडाच आहे तुला पूर्वीं सांगितल्या प्रमाणें धर्माचा अश्व सांप्रत मणि पूरा नजीक आला आहे. आणि आतां त्याला बभ्रुवाहनाचे सेवक बंधन करून राजस

भेंत नेतील. नंतर काय होईलतें अवलोकन कर.

पडद्या पलीकडे शब्द होतो

" राजाधिराज शौर्याद्यनेक गुण विराजित वैष्णव शिरोमणी मणिपुराधिश बभ्रुवीर राज महाराज "

( विदूषक शब्द ऐकून भीतो. )

**विदू.—** कायहो सूत्रधार हा काय घोटाळा.

**सूत्र.—** अरे हा बभ्रुवान राजाचा प्रतिहार शब्द करीत आहे. या ठिकाणीं आतां सर्व सरदार मान कन्यां सह वर्तमान बभ्रुवाहन प्राप्त होईल. ( दोघे निघून जातात. )

## प्रवेश. १ ला.

## स्थळ - मणिपूर.

### पात्रें

**बभ्रुवाहनराजा, सुबुद्धि प्रधान, शत्रुजितसेनापति यज्ञभोक्ता राज पुरोहित.**

(चोपदार हुजऱ्ये सेवक वगैरे. )



( भालदार ललकारत असतां सर्व सभाजनासह सिंहासनस्थ बभ्रुवाहन आहे इतक्यांत पडदा उचलतो. सर्व आदबी प्रमाणें मुजरे करून सर्व आपापल्या जागीं बसतात. )

**बभ्रुवाहन.**— ( सभेकडे पाहून ) प्रधान जी.

**प्रधान.**— ( हात जोडून. ) आज्ञा महाराज.

**बभ्रु०**— राज व्यवस्था चालविण्यांत आपण कुशल असल्या कारणानें मला कोणतीही चिंता नाहीं. परंतू वारं वार गुरूजी सांगत असतात. कीं, प्रधानजीस नित्यशः कांहीं राज संबंधीक प्रश्न करून त्या पासून माहिती करून घेत जा. ह्मणून आपणास प्रश्न करितों कीं, राजानें काम, क्रोध. व लोभ हे कोण कोण्या ठिकाणीं योजावे तें मला सांगा.

**प्रधान**- आज्ञा. श्लोक.

कामः प्रजापालनेच्व क्रोधः शत्रुनिबर्हणे॥ से
नासंधारणे लोभो योज्यो राजा जयार्थिना॥१॥

महाराज कामाची योजना नृपानें प्रजा पालनाकडे करावी. तसाच शत्रू संहार करण्यांत अवश्य क्रोध ठेवावा. त्या प्रमाणेंच सेना धारणीं लोभ ठेवावा. तरच नृपती सदोदीत यशस्वी असतो. आतां.

श्लोक.

परस्त्रीसंगमे कामो लोभो नान्यधनेषुच॥
स्वप्रजादंडने क्रोधो नैव धार्यो नृपेः कदा॥१॥

परस्त्री संगाविषयीं काम, परद्रव्यापहाराविषयीं लोभ, व स्वप्रजा दंडनीं क्रोध नृपानी कदापी ही ठेवूं नये. जो राजा अशी इच्छा ठेवितो तो त्वरितच लयास जातो. यांत संशय नाही.

**बभ्रु०**- शाबास, प्रधानजी आपली भाषणें श्रवण करून अत्यानंद प्रा

स झाला आहे. याराज्याला आपणाच प्रधान अह्मां ह्मणून व्यवस्था उत्तम चालली आहे. बरें राज वृक्षाला सदोदीत प्रफुल्लीत ठेवण्याक रितां काय करावें लागतें.

**प्रधान.**-- महाराज राज वृक्ष सदोदीत प्रफुल्लीत ठेवण्या करितां गो ब्राह्मणाची सेवा करून त्यांचे आशीर्वाद घ्यावे लागतात व स्वतः न्यायानें वागावें लागतें.

( इतक्यांत एक अश्व घेऊन हेर प्रवेश करितो. )

**हेर**— राज राजाचा जय असो. (नमतो.)

**बभ्रु**—(त्यास पाहून.) हेरा नगरा संबंधीं विशेष वर्तमान काय आहे तें कथन कर.

**हेर**— (अश्व पुढें करून.) महाराज, आपल्या वसंतोद्यानांत हा परकीय याज्ञीक असा अश्व प्राप्त झाला होता. त्यास उद्यान रक्षकानें बंधन करून माझ्या स्वाधीन केला हा. अवलोकन करावा.

**बभ्रु०**— (अश्वाकडे निरखून पाहून.) प्रधानजी, आजपर्यंत आप ण पुष्कळ अश्व अवलोकन केले, परंतु या सारखा अश्व आपल्या. पाहाण्यांत कधींच आला नाहीं. अहाहा ! कोणत्या भूपाचा हा अश्व असेल बरें?

**प्रधान**—महाराज, हा याज्ञिक अश्व आहे. अवलोकन करा याची- उत्तम पुष्पादिकें करून पूजा केलेली आहे. नाना प्रकारच्या रत्न मालानीं भूषित करून त्याच्या मस्तकावर सूवर्ण पत्रिका लेखन के लेली बांधली आहे; पहा. (पत्र काढतो.)

**बभ्रु०**—प्रधानजी, या पत्रांत काय लेखन केलें आहे हें वाचा श्रव ण करण्याची इच्छा आहे.

प्रधान— (पत्र वाचतो.) आर्या.

श्रीपंडूच्या तनयें, गोत्रजहत्यानिवारणासा
ठीं॥ हयमेध आरंभियलें, वाजी हा सोडिला क्षिती
पाठीं॥ १॥ वीरें धरितां यातें, कृष्णासखा पार्थ यु-
द्धत्यापाशीं॥ करूनि वारू नेईल, जो लढला
निकर करूनी सांबासीं॥ २॥ धरितां वारू दांतीं,
तृण धरूनी पार्थपदीं शिर ठेवा॥ युद्धीं मराल या
स्तव, न करा रे पांडवांपशीं हेवा॥ ३॥ शत्रू दंडुनि
सारे, जो झाला विजय विजय कुरुवीरीं॥ रक्षण
करितो याचें, तत्पदिं व्हा लीन नाहीं जय समरीं ४

बभ्रु०— (पत्रांतील विषय ऐकून क्रोधाविर्भावानें कपाळाला आठ्या घा-
लून व नेत्र लाल करून.) प्रधानजी, आज त्या भुमंडळावर पार्थ मात्रच प
राक्रमी झाला काय? इतर भूपतींनी काय हस्तामध्यें कंकणेंच धारण के
लीं काय? धिःकार असो त्या पुत्राला. वारू बंधन करून अश्व शा
ळेंत पाठवून द्या. आज समरांत पराक्रम करून करून अर्जुनाला अ
पयश नदींत बुडवीन. त्याच्या बंधूकडून व मातेकडून अश्रूपात
करवीन. तरच हा बभ्रुवीर! नाहींतर मातेच्या उदरीं येऊन तिच्या ता
रुण्याचा व्यर्थ नाश केला यास्तव.

दिंडी.

आजि पार्थातें मीच हरवीन॥ युद्धकौसल्यें भूप
दीपवीन॥ गर्वकवचा फोडोनि अजय आजी॥
समरीं त्यातें देईल हाच गाजी॥ १॥

कां सेन्याधीश? सैन्याची सिद्धता आहे किंवा कसें? कथन करा. वेळ

आल्या शिवाय परीक्षा होत नाहीं.

**सेना०-** महाराज, सेने विषयीं आपण काळजी करूं नये. आजच्या दिवशीं राज्यावर परशत्रू उत्पन्न होऊन आमचा पराक्रम महाराजांचे नजरेस यावा अशी इच्छा धारण करून बसलेले महारथी तीन अयुत आहेत. अश्वस्वार, गजस्वार, रथी व पायदळ किती आहे याची तर गणतीच नाहीं. व त्यांस नाना प्रकारच्या युद्धकौंसल्यांत निपुण करून ठेवलेले आहे तर तो पराक्रम महाराजानीं एकदां अवलोकन करावा अशी माझी इच्छा आहे

**बभ्रु०-** शाबास प्रधानश्रेष्ठा युद्धाची तयारी करा. मीं मातोश्रींची आज्ञा घेऊन असाच मागले पदीं प्राप्त होतों.

**प्रधान-** महाराजानीं कोपशांत करून दासाची विनंती एकवार श्रवण करावी.

**बभ्रु०-** प्रधानजी, काय म्हणतां आपण?

**प्रधान-** क्षमा असावी. महाराज, अर्जुन आपला पिता आहे असें-मला ठाऊक आहे.

**बभ्रु०-** सुबुद्धि, जरी अर्जुन माझा पिता असेल तरी माझा युद्धोत्साह कमी होणार नाहीं. व हें वर्तमान जर सत्य असेल तर ठीकच-आहे. असत्य असेल तर आपणास जड जाईल. असो. गुरूजींनी मला क्षात्र धर्म पढवितेवेळेस असें सांगितलें आहेकीं, समरांत, पिता, पुत्र, आप्त कोणीही जरी प्राप्त झाला तरी त्याज बरोबर युद्ध करावें या करितां आपण युद्धाची तयारी करा तों पर्यंत मी मातुश्रीचें दर्शन घेऊन येतों. मातेची आज्ञा जशी होईल त्या प्रमाणें मग वर्तणूक करूं-.

**प्रधान-** आज्ञा महाराज. (बभ्रुवाहन उठतांच सर्व त्यास उत्थापन देतात

चोपदार लल कारत असतां पडदा पडतो. )

( सर्व निघून जातात. )

## प्रवेश २ रा.

### स्थळ - राजसौंध

### पात्रें

**उलूपी, चित्रांगी**, बभ्रुवाहनाच्या माता, **बभ्रुवाहन** राजा. व **मालती**. दासी. इ०



( दासी सहवर्तमान उलूपी व चित्रांगी प्रवेश करितात. )

**चित्रांगी** — उलूपी बाई आजकाल जिवाला स्वस्थता नाहीं. बहुत दिवस झाले प्राणनाथा वांचून या पितृदत्त संपत्ती घर बालकाच्या मुखा कडे पाहून काल क्रमण करीत आहों. स्त्रियांचें दैवत पती त्या शिवाय या अबल जातीला दुसरा तरुणो पाय नाहीं. असें आपण नानाप्रकारच्या इतिहासांतहीं श्रवण करतां वारंवार प्राणप्रियाची आठवण होऊन शरीरावर रोमांच

उभे राहातात. कोणत्या वेळेस प्राणनाथाच्या चरणीं मस्तक ठेऊन धन्य होईन असें झालें आहे.

**उलपी**— खरेंच बाई. त्यावेळची तीर्थयात्रा करीत आलेली रम्य मूर्ती माझ्या डोळ्या समोर दिसत्ये व देहभान नाहींसें होऊन कांहीं वेळ निद्रवश झाल्या प्रमाणें स्वप्नवत जातो. त्या प्रमाणें त्या गांडीव धराशिवाय दश दिशा शून्य भासतात. राज्य, धन, संपत्ती, सर्व आहे परंतु उपयोग काय त्यानंतर इकडची मुळीच आठवण होत नसेल. आपण मात्र झुरणीस लागलों आहोंत.

( इतक्यांत बभ्रुवाहन प्रवेश करितो. )

**मालती**— ( हात जोडून. ) बाईसाहेब बभ्रुवाहन महाराज येत आहेत अवलोकन करा.

**दोघी.**— आंत येऊं दे.

**बभ्रु०**— ( त्यांच्या जवळ येऊन. ) उलपी माते वंदन करितों. चित्रांगी आई वंदन करितों.

**दोघीमा०**— बालका दीर्घायू हो. बैस. ( चित्रांगी त्यास मांडीवर घेऊन बसत्ये. व तोंडावरून हात फिरवून. ) बाळा आज सज्ज होऊन कोणत्या ठिकाणीं जाण्याच्या विचारांत आहेस बरें? मुखावर घर्मबिंदु आले आहेत. पृष्ठीवर बाण भाता बांधलाच आहेस. खड्ग, बर्ची, पट्टीश, आदिकरून आयुधें जागच्या जागीं लागून कोणा बरोबर युद्ध करण्याची तयारी केली आहेस ही.

**बभ्रु०**— मातुश्री आजपर्यंत जे पराक्रम केले, जी किर्ति मिळविली योद्धा असें सर्व राजे म्हणतात. त्याची कृतकृत्यता होण्याचा समय आला आहे. फक्त तुमची आज्ञा घेऊन रणांत गमन करावें याच हेतूनें प्राप्त झालों आहे

चित्रां० — वत्सा आज युद्ध करून कोणत्या वीर मातेला शोकाब्धितटा कणार तें मला कथन कर.

बभ्रु० — आइ, हस्तनापुरांत वास्तव्य करणारे पंडूचे पुत्र धर्म भीमादी पांच आहेत त्यांस गोत्रज वधाचा दोष घडल्या कारणानें त्याणी अश्वमेधास प्रारंभ केला आहे. हयमेध करण्या करितां अश्व पृथ्वीवर सोडून तदर्थ सर्वराजे जिंकावे लागतात. तो अश्व आज आपल्या मणिपुरांत आला आहे. त्याचे रक्षणार्थ अर्जुन प्रभृती कोट्यावधी वीर आले आहेत. अश्व मस्तका वरील पत्रिकेंत असें लेखन केलें आहे कीं, जो कोणी वीर जनीच्या पोटीं उत्पन्न झाला असेल त्याणेंच अश्व बंधन करून युद्ध करावें. व अर्जुन त्याचा पराभव करून अश्व घेऊन जाईल. ज्यामधें सौर्य नसेल त्याणे हस्त पाद बंधन करून दांतीं तृण धरून कर भारा सह अर्जुनास शरण जावें. म्हणजे जन्म घेतला आहे. तो तुझें उदर धन्य करण्या करितांच होय. तर आज रणांत अर्जुनाला जिंकून जयश्री सह वर्तमान ख्याती करून तुझे दर्शनास येईन. तरच तुझा पुत्र. नाहीं तर मुख सुद्धां दाखावणार नाहीं. तर मातेु आतां विलंब न करितां मला युद्धास जाण्याची लवकर आज्ञा दे

दोघीमा० — (अर्जुन आला हें वर्तमान ऐकून आनंदानें.) बालका.

कामदा.

आणर पिता विष्णुतो तुझा ॥ नाहिं आसरा त्याविणें दुजा ॥ अश्व दे तया पाय वंदूनी ॥ आण मंदिरीं आसु-चाधनी ॥ १ ॥ साकी

हेतू बहु दिवसांचा पतिचे, पाय कधीं दिसतील ॥ ईश-दयेने तोच पातला काल प्रेम येईल ॥ १ ॥ धनसंपत्ती

सहितजाऊनी ॥ दर्शनघेजनकाचें ॥ आणुनीनगरींदा
वींआह्मां· सस्मितमुखभर्त्यांचें ॥ २ ॥ वियोगवन्हीजा
·ळितहोता, आह्मांतेंबसाल ॥ पतिभेटीचेंउदकतयाव
री, आणुनिसत्वरीघाल ॥ ३ ॥

**बभ्रु०**— आईग, पुत्रानें मातेची आज्ञा शिरसा वंद्य करावी हा पुत्रधर्म खरा· परंतु क्षात्र धर्म पढविले वेळेस गुरूजीनें सांगितलं आहेकीं, समरंगणांत पिता, पुत्र, कोणीही जरी प्राप्त झाला तरी त्याच्याशी युद्ध करावें तरआई पहिल्यानेंमीं अर्जुना बरोबर युद्ध करतों जरत्याणें माझा पराभव केला तर ठीकच आहे· मीपराभव केला तरत्यास शरण जाईन व वारू सह सर्व संपत्ती त्याला अर्पण करून त्याचे साह्यार्थ गमन करीन·

**उल्पी**— बाळा, बभ्रुवाहना, इतका द्राविडी प्राणायाम करून व्यर्थ त्याना त्रास दिल्या सारखें मात्र होईल· आम्हांला तर असें झालें आहे कीं, केव्हां त्याचे पाय नजरेस पडतील· या करतां हा युद्ध करण्याचा दुराग्रह सोडु आणि प्राणनाथांस आपल्या मंदिरीं लवकर घेऊन ये·

**बभ्रु०**— (कांहीं विचार करून·) आज्ञा आई, आता तुमच्या आज्ञें प्रमाणें-चमी क्षात्र धर्म पणाचा त्याग करून त्या पार्थ वीराला शरण-जातों·

**दोघीमाता**— जा बाळा, ईश्वर तुला यशस्वी करो·

(बभ्रुवाहन निघून जातो व पडदा पडतो·)

## प्रवेश ३ रा·

### स्थळ-राज सभा·

### पात्रें·

**बभ्रुवाहन राजा, प्रधान, सेनापती वगैरेस०**



(प्रधान व सैन्याधीश. सेनेची तयारी करीत आहेत. इतक्यांत बभ्रुवाहन प्रवेश करितो.)

**प्रधान**--- (त्यास पाहून.) महाराजाचा जय असो. (नमतो.)

**बभ्रु०**— प्रधानजी आपण सांगितलेलाच विचार खरा झाला.

## कामदा.

तात आमुचा जिष्णु तो खरा, माय सांगत्ये आणत्या घरा ॥ वाजिसंपत्ती सर्व घेउनी ॥ भेटुत्या जलालीन होउनी ॥ १ ॥

**प्रधान**— आज्ञा महाराज, सर्व तयारी आहे. चलावें जशी आपली इच्छा असेल त्या प्रमाणें.

**बभ्रु०**—सुबुद्धी आपण सुज्ञच अहां. मी सांगावें असें नाहीं परंतु बरोबर युद्धाची ही तयारी असावी असें वाटतें कारण मात्राज्ञे प्रमाणें आपण त्यास शरण तर जातच आहों तरी हा वेळ कसा येईल याचा नियम नाहीं या करितां आपण आपल्या कडून फार सावध असावें हेंच चांगलें.

प्रधान.— ठीक आहे. महाराज चलावें (चालूं लागतात.)

छंद

बभ्रुवीर दळ फार, त्याच्या सैन्याना हीं पार ॥
वारू दिसती अनिवार ॥ ताजि नाना वर्णाचे ॥
धनी हस्ती चरतात ॥ वरी शोभती महात ॥ उष्ट्रां
ची दाटी बहुत ॥ स्यंदनादी परीचे ॥ ऐसा सैन्या
चा थाट ॥ सुशोभीत दिसे वाट ॥ पुढें गर्जतात.
भाट ॥ वरी हस्त ज्ञाणपां ॥ १ ॥

या प्रमाणें सैन्या सह वर्तमान बभ्रुवाहन पित्याला शरण चाल-
ला असतां नागरीक स्त्रिया त्यास पंचारती करितात. कित्येक मंगलो
पचार करितात. अशा थाटानें स्वारी नगराच्या बाहेर जाते.

(पडदा पडतो.)



## प्रवेश ४ था.

### स्थळ-रणभूमी.

### पात्रें.

अर्जुन वृषकेत, मदन, मघवर्ण, यौवनाश्व, अनुशाल्व, हंसध्वज सुवेग, बभ्रुवाहन, सुबुद्धी, बभ्रुवाहनाचें सैन्य.

( सर्व सैन्यासह पार्थ प्रवेश करितो. )

**अर्जुन**- हंसध्वजा, आपण या बभ्रुवाहनाचा पराक्रम फारच वर्णन केलात परंतु आद्याप त्याच्या कडून कांहींच समजत नाहीं हें कसें काय आहे.

**हंसध्वज**- अर्जुना, ज्यावेळेस बभ्रुवाहनाची आणि तुझी समरांत गांठ पडेल, त्यावेळेस मी वर्णन केलेंनें खरें किंवा खोटें हें समजेल. तुला खचित सांगतों कीं, बभ्रुवाहाना सारखा वीर आज पर्यंत तुझ्या पाहाण्यांतच नसेल.

( इतक्यांत दळासह वर्तमान बभ्रुवाहान प्रवेश करितो. )

**बभ्रु०**- ( पार्थाच्या चरणावर मस्तक ठेवून. ) पित्या वंदन करितों.

### साक्या.

तवबालकमीं अंकीं घेमज कृष्णाप्रियाममता
ता ॥ वात्सल्यानें क्षमाप्रतिदे, चित्रांगीममर्मा
ता ॥ १ ॥ आसबहु दिवसाची पुरली, कृष्णाकृपे
नें साची ॥ पदकमलातें पाहुनी धालों, उकळी-
ये प्रेमाची ॥ २ ॥ वारू धनसंपत्ती तुझिया, चरणी
अर्पणकेली ॥ स्वीकारी तुजमानीतसें मी देवसु
तवनमाळी ॥ ३ ॥

**सर्वराजे**– पार्थमहाराज, पुत्राला क्षेमालिंगन द्यावें याच्या सारखा पुरुषार्थी वीर त्रैलोक्यांत सांपडणार नाहीं. सर्व नृपती याला शरण येत याचा पराक्रम अवर्णनीय आहे.

**अर्जुन**– ( क्रोधानें बभ्रुवाहनाच्या मस्तकावर लत्ताप्रहार करून. ) मूर्खा निर्लज्जा, तूं माझा पुत्र नव्हेस. दुष्टा, षंढा, निर्बळा. रे भयग्रस्ता, माझा पुत्र म्हणण्यास लाज वाटत नाहीं काय? तुला चित्रांगीनें जारत्वें करून उपजविला असेल. धिःकार असो तुला. षंढा अश्व मस्तकावरील लख पाहून भयभीत झालास "मी तुझा पुत्र" असें म्हणतोस. हा पार्थ केवळ शत्रुरूप गजमस्तकास विदारण करणारा नरसिंहच असतां याच्या वीर्यापासून तुझ्यासारखा जंबुक कसा उत्पन्न होईल? माझा पुत्र अभिमन्यू ज्याणें कुरुक्षेत्रीं संगरांत ख्याती करून कर्ण, द्रोण, वगैरेंची मती गुंग केली. तोच माझा एक सिंहासारखा पुत्र होऊन गेला तूं जंबुक मला पुत्र शोभत नाहींस. यावरून तूं नर्तकीचाच आहेस यांत संशय नाहीं. आतां मी तुला इतकेंच सांगतों कीं, तूं नटवा होऊन आपला उदरनिर्वाह कर तूं क्षत्रिय नव्हेस. हस्तांतील शस्त्रास्त्रें टाकून दे व नृत्य कर.

**बभ्रु०**– ( अर्जुनाचें निंदास्पद भाषण ऐकून प्रळयाग्नी सारखा लाल होऊन क्रोधानें ) पार्थवीरा, तुझीं सर्व भाषणें मीं सोसून घेतलीं परंतु तूं माझ्या मातेला जो जारत्वाचा दोष दिलास त्या योगानें घृतसिंचित वैश्वानर जसा प्रदीप्त होतो त्या प्रमाणें हृदयांत क्रोधाग्नी भडकून गेला आहे तर हस्तांत धनुष्यबाण घे आणि माझ्या बरोबर युद्ध कर. आज तुला क्षत्रिय धर्म दाखवितों. तुझ्या गर्वाचें कवच आज रणांत मी विदारण करून तुझा शिरच्छेद करितों. इंद्र, रुद्रा, आणि द्रोण यांचे पासून जी विद्या संपादन केलीस तिचा झाडा दे. आज मी रणयज्ञ करून त्यांत

तुझ्या बरोबर आलेल्या नृपतीच्यां आहुती देतों. व शेवटीं तुझी पूर्णा हुती देऊन तुझ्या मातेच्या अश्रूंनीं रणयज्ञाची शांति करितों अवलो कन कर. (सुबुद्धी कडे पाहून.) प्रधानजी, अवलोकन काय करता वारू सहवर्तमान सर्वसंपत्ती नगरांत पाठवून द्या. आणि युद्धाची तया री करा. आजमी पार्थाचा शिरच्छेद केल्या खेरीज मागें फिरणार नाहीं.

**सु. बु०**— आज्ञा महाराज. (असें म्हणून वारू व संपत्ती नगरांत पाठवून देतों. रणतुरें वाजूं लागलात. सर्व सैन्य युद्ध क्रमानें उभें रहातें व दुं दुभीचा ध्वनी होतो.) महाराज, रथांत बसावें. असें म्हणून सार थ्यासह रथ पुढें आणतात. आणि बभ्रुवाहान रथांत बसतो.)

**बभ्रु०**— प्रधानजी, यावेळेस या ठिकाणीं युद्ध करणारें सैन्य किती तयार आहे बरें?

**प्रधान**— महाराज, यावेळेस साठ कोटी रथी. दहा कोट महारथी, साठ अर्बुद स्वांर, दोनखर्व पायदळ, इतकें लष्कर तयार आहे. आपण- काळजी करूंनये. सेनाधीश व मी याची सर्व व्यवस्था करितों.

**बभ्रु०**— शाबास (असें म्हणून युद्धारंभ करण्याकरितां चापाला गुणला वून विद्युल्लतेच्या गुटगुटा प्रमाणें चापाचा टणत्कार करितो आणि म्ह णतो हे पार्था, आतां सावध हो आणि तुझें प्राण हरण करणारे मार्गण येतात हे सांभाळ आजजर कोणी तुझें संरक्षण करणारा असला तरत्या चें स्मरणकर. (असें म्हणून बाणाची वृष्टी करितो. इतक्यांत अनुशा ल्वबाण सोडीत मोठ्या वेगानें बभ्रुवाहनाच्या पुढें येऊन उभा राहतो.)

**अनुशाल्व**— बभ्रुवाहना, आज फार गर्वोक्ती करून युद्धाला आरंभ के ला आहेस परंतु अद्याप पर्यंत अनुशाल्ववीर तुला समरंगणांत भेटला- नव्हता. म्हणून तुला बडबड करण्यास शंका वाटली नव्हती. असो,

आतां हे माझे सायक तुझ्या आयुष्य सिंधूचें जल अगस्ती रूपानें प्राशन करतील अवलोकन कर.

**बभ्रु०—** अनुशाल्वा, मृत्युसमयीं तुझ्या जिव्हेला फांटा फुटला असें मला वाटतें. अरे जिविनाची आशा धरून त्या पार्थाला शरण गेलास व त्याच्याच जिवावर मजबरोबर प्रथमतः युद्धार्थ आलास तर जो तूं स्वधर्माला सोडून दुसऱ्याला शरण जाणारा व स्त्री जशी भ्रताराच्या जिवावर भाषणें करिते तशीं भाषणें करणारा पृथ्वीवर उपयोगाचा नाहींस म्हणून तुला आज या बाण गर्तेंत स्नान घालून शुद्ध करतों ( असें म्हणून अनुशाल्वाचा स्यंदन चूर्ण करितो.

**अनुशाल्व—** ( दुसऱ्या रथांत बसून असंख्यांत बाण सोडतो व भयंकर सिंहनाद करून ) सांभाळ रे सांभाळ.

**बभ्रु०—** ( सर्व बाणाचे निवारण करून निर्वाणीचे शंभर बाण त्याजवर सोडतांच त्याचा सारथी ) रथाचे घोडे, व रथ चूर्ण होऊन कांहीं बाण त्याच्या हृदयावर लागतांच अनुशाल्व मूर्छित होतो.

**मदन—** ( अनुशाल्व पडलासा पाहून क्रोधानें बाण सोडित पुढें येतो. ) बभ्रुवाहाना तुला वाटलें असेल कीं, मीं अनुशाल्वास पराजित करून कृतार्थ झालों परंतु असें समजूं नको - हा पुष्पधन्वा कोट्यावधी प्राण्यास गुप्त रूपानेंच घायाळ करणारा प्रत्यक्षतः तुझ्यासमोर आला आहे तर आतां तुझी व्यवस्था कशी होईल याचा नीटपणें पूर्ता विचार कर.

**बभ्रु०—** प्रद्युम्ना रे कृष्णपुत्रा, " मी कोट्यावधी प्राण्यास गुप्तरूपानें घायाळ करतों." असा आपला पराक्रम मला सांगतोस परंतु असें समज कीं. ज्या निरपराधी प्राण्यास तूं गुप्त रूपानें घायाळ करितोस त्यांच्या शापरूपी रज्जूनें यमरूपी बभ्रुवाहनापुढें तुला ओढून आणलें-

आहे तर आतां जिविताची आशा सोड व अंतीं परलोक साधनार्थ कृष्ण स्मरण कर ( असें म्हणून दोघे एक मेकांवर असंख्यात बाण जाळ सोडिता त· त्या योगानें अर्जुनाच्या असंख्यांत सैन्याचा संहार होतो भयंकर रण माजून रक्ताचा पूर वाहूं लागतो· त्या वेळेस भूतावळी अतृप्त रण भक्षण करून नाचूं लागतात· व कलहांत एकमेकांवर शिरें भिरकावून मूर्च्छित होतात· बभ्रुवाहनाच्या अवर्णनीय पराक्रमानें कोट्यावधी रथी, अतिरथी, महारथी, अश्व, गज, सारथी मृत्यु पावतात· व मदन मूर्च्छित होतांच बभ्रुवाहन त्यास बद्ध करून नगरांत पाठवून देतो· इतक्यांत भयंकर गर्जना करून मेघवर्ण रथावर बसून युद्धास पुढें येतो· बभ्रुवाहनाचें व त्याचें इंद्रजित सौमित्रा सारिखें युद्ध होत असतां असंख्यात कलेवरें पडतात· समरंगणांत मृत्यु पावलेल्या वीरांस अप्सरा विमानांत घेऊन पंचारत्या करताहेत· व जे मृत्यु भयानें पलायन करितात त्यांस पिशाचें भक्षण करितात· अशी घोरांदर रण धुमाळी चालली असतां मेघवर्ण मूर्च्छित होतांच हंसध्वज आपल्या सैन्यासह मोठ्या वेगानें येतो व बभ्रुवाहनाची पांच सहस्र सेना गतप्राण करितो· हें पाहून बभ्रुवाहन भात्यांतून सतेज तीन बाण काढून हंसध्वजास मूर्च्छित करितो· इतक्यांत सुवेग येऊन बभ्रुवाहनाचे दहा हजार हत्ती वर बसून युद्ध करणारे वीर मारतो हें पाहून बभ्रुवाहन त्याचा शिरच्छेद करितो· तें शिर मोठ्या वेगानें उसळतें व बभ्रुवाहना सन्निध आदळतांच बभ्रुवाहनास मूर्च्छा येते परंतु बभ्रुवाहन मूर्च्छा सांवरून सज्ज होतो· इतक्यांत वृषकेत युद्धास येतो· दोघेही इंद्र वृत्रा सारिखें भयंकर युद्ध करूं लागतात· एकमेकांची वर्में लक्षून नाना प्रकारचे शस्त्र घाय करीत असतां देव विमानांत बसून दोघांचा युद्ध चमत्कार पहात असतां आनंदानें पुष्प वृष्टी करितात· बभ्रुवाहन

कित्येक जिवंत वीरांस धरून नगरांत पाठवितो. तिकडे उलूपी व चित्रांगी आपले भ्रताराचे वीर म्हणून प्रेमानें त्यांचे घाय बांधतात. अर्जुनाच्या शिबिरास हे सर्व संपत्ती बभ्रुवाहन लुटून नगरांत नेतो.

**अर्जुन**– (सचिंत.) वृषकेता आज बरी व्यवस्था दिसत नाहीं. तूं गजपुरास गमन कर. याठीकाणीं जर तुला कांहीं विपरीत झालें तर धर्म व कुंती प्राण देतील. मला खचित वाटतें कीं, आतां अश्वमेघ कृत्य राहिलें धर्मानें अशीपत्र व्रताचा नेम केला तो व्यर्थ गेला मलातर मृत्युची चिन्हें जाणवतात. बाळा माझें सर्व सामर्थ्य नष्ट झालें (इतक्यांत अर्जुनाचे रथावर गृध्र मांसाचे तुकडे आणून टाकतात. ते पाहून अर्जुन भयग्रस्त होतो.

**वृषकेत**– तात महाराज, आतां मी गजपुरास खचितच गमन करणार नाहीं महाराज, एकवेळ पूर्वेस उदय पावणारा सूर्य पश्चिमेस उदय पावेल, सागर मर्यादा उल्लंघन करील, पिपीलिका वडवानळ भक्षण करील परंतु मी समरंगणांतून परत जाणार नाहीं. आज मी निर्वाण करून या बभ्रुवाहनाचा प्राण घेईन. (असें म्हणून क्रोधानें रथ पुढें लोटतो.) बभ्रुवाहना आतां समरंगणांत स्थीर होऊन माझे शर अवलोकन कर (असें म्हणून तीन बाण बभ्रुवाहनाच्या वर्म स्थळीं मारितो. बभ्रुवाहन दुसऱ्या रथारूढ होतो. दोघेही एकमेकांवर अस्त्र जाळ सोडतात )

**बभ्रु०**– (आनंदानें.) शाबासरे वीरा शाबास ! धन्य योद्धा आहेस तूं (असें म्हणून एक शक्ती वृषकेतावर सोडतो.

**वृषकेत**– शाबासरे वीरा ! (शक्ती आलीसें पाहून बाणांनीं तिला तोडून टाकतो. )

**बभ्रु०**– सांभाळरे वीरा ! (असें म्हणून बाणानें वृषकेतास रथासहित उडवून सूर्य लोकीं पाठवून देतो. तो रथ दोन दिवस सूर्यलो-

कीं भ्रमण करून तिसरे दिवशीं वृषकेतासह भूमीवर येऊन पडतो. )

**वृषकेत–** ( सावध होऊन. ) बभ्रुवाहाना आतां माझें हस्तलाघव अवलोकन कर ( असें म्हणून एक बाण सोडून बभ्रुवाहानास आकाश पंथें उडवून देतो. इतक्यांत बभ्रुवाहन त्याच्याच अंगावर उडी टाकतो. याप्रमाणें दोघांचें ५ दिवस पर्यंत एक सारखें घोर भयंकर युद्ध चाललें आहे. )

**अर्जुन–** ( दोघांचा युद्ध चमत्कार पाहून प्रेमानें. ) हे वीर या अवनीवर धन्य आहेत. असें युद्ध मी आजपर्यंत कधींच अवलोकन केलें नाहीं. वाहावारे वाहावा. उभयतांच्या छपन्न देशींच्या युद्ध कला अवलोकन करून आनंद झाला. असें न भूतो न भविष्यती युद्ध पाहिलें तर नाहींच परंतु कोठें श्रवण ही केलें नाहीं ( नेत्रांतून प्रेमाश्रु वाहूं लागतात. )

**बभ्रु०–** अरे, हे वीरा, तुझें हस्तलाघव आणि युद्ध कौशल्य अवलोकन करून मला फार संतोष झाला. आज पर्यंत मीही पुष्कळ योद्ध्यांस हत वीर्य करून यशस्वी झालों व आज तुझाही वध करणार परंतु तुझ्या सारखा युद्धीं दक्षवीर मी आज पर्यंत अवलोकन केला नवता. आज तूं मजबरोबर युद्ध करून माझी युद्धेच्छा फल द्रूप केलीस तर तूं आपलें नाव मला सांग.

**वृषकेत–** बभ्रुवाहना, जो सूर्य पुत्र कर्ण, ज्याची जगांत दाना विषयींख्याती आहे. ज्याणें परशुरामा सारिखें गुरु करून धनुर्विद्या संपादन केली, जो महान पराक्रमी त्याचा पुत्र मी वृषकेत आहें.

**बभ्रु०–** वृषकेता अरेरे, धिःकार असो तुझ्या शौर्याला व पराक्रमाला, अरे तो कर्ण महान पराक्रमी आणि त्याच्या पोटीं तूं मा

न धना विषयीं केवळ षंढ उत्पन्न झालास असें मी समजतों अरे, या-अर्जुनानें केवळ अधर्म करून तुझा पिता व्यसनांत ग्रस्त झाला असतां याचा वध केला हें तुला ठाऊक नाहीं काय? मूर्खा त्या अर्जुना बरोबर कशाला फिरतोस. तूं माझ्या पृष्ठ भागीं ये म्हणजे तुझ्या पित्याच्या वध करणाऱ्याचा सूड घेतों.

**वृष०** — बभ्रुवाहना, जरी माझ्या पित्याचा अर्जुनानें कपटानें वध केला हें खरें आहे. तरी अर्जुन व माझा पिता हे उभयतां बंधुच होत. त्याणीं आपसांत कितीही कलह केला तरी ते एकत्र असें समजलें पाहिजे. मात्र आतां मजबरोबर तूं ही निर्वाणीचें युद्ध कर व मी ही निर्वाणीचेंच युद्ध करितों. व्यर्थ बडबड उपयोगी नाहीं (इतकें ऐकतांच बभ्रुवाहन एक तेजस्वी बाणाची योजना करून वृषकेताचा शिरच्छेद करितो. तें शीर आकाश पंथें उडून बभ्रुवाहनाचे वक्षस्थळावर आदळून त्यास मूर्च्छित करितें व पुनरपी उडून अर्जुनाच्या पदाजवळ जाऊन पडतें.)

**अर्जुन** — (वृषकेतानें शीर पाहून शोक करितो.) (शिरास हृदयीं आलिंगून.)

दिंडी.

अहा बंधो सूर्यजा कर्णवीरा ॥ फरशधर शिष्या-
महासमरधीरा ॥ समजूं नाहीं दीधलें बंधुनातें ॥
पुत्ररूपें वारिली आपदातें ॥ १ ॥ अरे वृषकेता बा
लका कसा रे ॥ त्यजुनि मज ला जातोस एकटा
रे ॥ प्रती कर्णाच तुला पाहुनीया ॥ बंधु पांच
ही सौख्यांत सो जगीं या ॥ २ ॥ धर्म कुंती ऐको-

निदेतीप्राण ॥ अशीवार्तात्यांदुःखदेईजाण ॥ तुझेगुणआतांआठवूं किती ॥ एकशब्दातेंतरीबोलबारे ॥ ३ ॥

पद.

कोठवरीतनयदुःखसांठवूं ॥ तुजविणमीदीनरणीकोणआठवूं ॥ ध्रु० ॥ यौवनाश्वजिंकुनियांअश्वआणिला ॥ अनुशाल्वपाईंधरुनीतूंचिताडिला ॥ आजचिकांपार्थअप्रियजाहला ॥ बाळारेगुणतुझेकितीमींआठवूं ॥ कोठवरीत० ॥ १ ॥

ओव्या.

तुजवरीपांचाळीचेंमन ॥ तीऐकतांत्यागील प्राण ॥ राहिला अश्वमेधमहायज्ञ ॥ कैसेंरहे वृषकेता ॥ १ ॥ आतांहेप्राणकायठेवून ॥ माझेचोधेबंधूदेतीलप्राण ॥ कुलक्षयजाहलासंपूर्ण ॥ ऐसेंवाटेमजआतां ॥ २ ॥

साकी.

कुलदीपकआदित्यचिगेला ॥ अस्ताचळासआजा ॥ धांवतयेंईंयादवराया ॥ कांपाहसिहेंचोज ॥ १ ॥

( असें म्हणून मूर्च्छित होतो. )

बभ्रु०— ( त्यास धनुष्यकोटीनें टोंचून. ) पार्था उठउठ अरे रणांत शत्रु-वक्षस्थळावर पाय देऊन उभा असतां त्याच्या समुर शोक करीत बसावें ह्याच कायरे क्षत्रियधर्म शिकलास? धिःकार असो तुला. मूर्खा पहा जारिणीचा आहे किंवा साध्वीचा आहे याचा अनुभव घे. षंढ आहेकींवा वीर आहे

याचा परिचय घे, अरे एकाद्या पति विरहित असलेल्या दीन स्त्रिये-सारखा शोक काय करतोस? अरे तूं जुना योद्धा आहेस आणि आज पर्यंत तूं पुष्कळ वीरां बरोबर युद्ध करून युद्ध कर्माचे फार अनुभव घेतलेस. असें असतां शोक करित काय बसलास? अरे उठ, हातांत धनुष्य घेऊन माझ्या बरोबर युद्ध कर अरे मूर्खा, रणामध्यें रूदन करित बसलास याची तुला लाज वाटत नाहीं काय? उठ उठ.

**अर्जुन–** (अशी निंद्योक्ती ऐकतांच मोठ्या क्रोधानें हातांत गांडीव-घेऊन त्याचा टणत्कार करितो) मूर्खा बभ्रुवाहना, एतावत्काल पर्यंत पुत्र शोकानें मोह पावलों असतानां तूं नाना प्रकारें करून माझी निंदा केलीस नीचा तूं यःकश्चित तुला पराक्रम काय दाखवूं. अरे एकाद्या लहान अर्भकास जसें खेळवितात तसें तुला या युद्धांत आतां मी खेळवितों अवलोकन कर. ( असें म्हणून जशा मेघ धारा पडतात तसा असंख्य बाणाचा वर्षाव करूं लागतो. बभ्रुवाहनाची असंख्य सेना मरण पावते. कित्येक शिरें मणिपुरांत जाऊन पडतात. आकाश बाणानीं व्याप्त होतें. दश दिशांचे मुखांत धूळ भरून मणिपुरांतील गोपुरें रिचूं लागतात. )

**बभ्रु०–** (अर्जुनाचें घोर युद्ध पाहून मनांत.) धन्य रे धन्य !!! किरिटीवीर! या जगांत तूं धन्य आहेस. ( असें म्हणून लक्षाचे लक्ष बाण सोडून अर्जुनाच्या रथा वरील चक्र तोडितो व ध्वज स्तंभींच्या कपीसह वर्तमान विजयरथ निराळीं उडवून देतो. )

**अर्जुन–** ( भूमीवर उतरून क्रोधानें ) बभ्रुवाहना एतावत्काल पर्यंत माझ्या सर्व वीरांचा संहार करून तूं आपल्या मनांत धन्य आहें असें जाणतोस परंतु खूब समज आज तुझा अंतकाळ समीप आला आहे

या वेळेस तुझें सकुंडल मस्तक धरणीवर पाडून टाकतों संभाळ आतां.

**बभ्रु०** — अधमा, पार्था, माझ्या मातेला दूषण देवणारा तूं तुझें मुखा वलोकन सुद्धां करूं नये. पातक्या तूं पूर्वी कुलक्षय करून आप्त गोत्रजा दिकांच्या हत्या केल्यास, चांडाळा, जो महान पराक्रमी कर्ण व्यसनांत असतां त्याचा वध केलास आणि मी पराक्रमी अशी प्रौढी दाखवितोस तुझी लाज नाहीं शीच झाली काय ? अरे वृषकेत माझा बंधू केवढा पराक्रमी कीं जो माझ्या बरोबर पांच दिवस युद्धाला टिकला. आतां अंतीं पराजित झाला म्हणून त्याचा पराक्रम कमी अशी गोष्ट नाहीं मूर्खा तुला त्या पातका पासून सोडविण्या करितां आ- तां हें बाण रूपी पंचगव्य तुला देतों " यत्त्वगस्ति मंत्राचा जप करून" ग्रहण करे ( असें म्हणून अर्धचंद्र बाण काढून पार्थाचें शीर आकाशीं उडवून देतो. व जय वाद्यें वाजनीत मणिपुर नगरांत प्रवेश करितो. )

## प्रवेश ५ वा.

### स्थळ-मणिपुर-उलूपी चित्रांगीचामहाल.

### पात्रें-उलूपी, चित्रांगी, दासी आणि बभ्रुवाहन.



( दासीसह वर्तमान उल्पी व चित्रांगी प्रवेश करितात. )

**चित्रांगी**– उल्पीबाई, काय करावें आद्याप पर्यंत बालकाचा तर ठिका णच नाहीं. प्राणनाथा सह वर्तमान वत्स केव्हां दृष्टीस पडेल. असें झा लें आहे. त्याच्या बरोबर युद्ध करूनको म्हणून सांगितलें असतां- ही बालकानें युद्धारंभ केला आहे. आतां समरांत जया पजय को- णास येतो याचा तरी नेम आहे का? परमेश्वर करो आणि प्राणनाथा चें दर्शन लौकरच होवो. म्हणजे झालें ( उजवा डोळा लवतो त्या योगानें किंचित साशंक होऊन: ) अग बाई या अपशकुनानीं तर प्रा ण कासावीस होतात. आतां काय करावें?

**उल्पी**– बाई आतां व्यर्थ काळजी करून उपयोगीं नाहीं. करूं नये तो युद्धाला आरंभ केला. त्याचे कोट्यावधी वीर त्याणें नगरांत पा ठवून दिले. त्यांची अगणित संपत्ती हरण करून आणली आतां ई श्वरा जवळ एवढेंच मागणें आहे कीं; जयानें किंवा अपजयानें कसे तरी प्राणनाथ दृष्टीस पडोत. म्हणजे झालें. ( वाद्यांचा ध्वनि ऐकून दासीस. ) जाग दासी जयवाद्यें वाजत आहेत तर पुत्र कोणत्यारी तीनें आनंद करीत नगरांत येत आहे. तें अवलोकन करून परतये.

( दासी जाते व म्लान मुख परत येते. )

**दासी**– बाईसाहेब, महाराज विजयी होऊन आले. परंतु त्या णीं विजयास रणांत ठेवला.

**चित्रांगी**– म्हणजे?

**दासी**– अर्जुनाचा रणांत वध झाला. ( इतकें ऐकतांच दोघीही ज साकर्दळी वर वज्रपात होतांच पडल्ये तशा धाडकन जमीनीवर अंग टाकितात. )

**दिंड्या.**

दासी—आहानाथकांत्यजिलसाआम्हाला ॥ आहा-
दैवानेंघातियल्लाघाला ॥ जळोही वार्ताआज
आयकाया ॥ जीवितासहराहिलीकर्साकाया
॥१॥ काय पूर्वीअपराधआम्हीकेला ॥ म्हणुनि
तुमचानिष्ठुरजिवझाला ॥ नकादुबळ्याच्याअं
तअतांपाहूं ॥ उभारहाआम्हींतुम्हांसवेंयेऊं ॥ २
अहाकृष्णाकांआजनिजलासी ॥ कसाभक्तां
लावेळींविसरलासी ॥ आजिझाल्याकींनष्टस
र्वआशा ॥ पातलेंहेंवैधव्यप्राणनाशा ॥ ३ ॥ हाय
दैवारेआसबहुतदिसांची ॥ होतीपाहूंकीमूर्तिकि
रीटन्ची ॥ परीकर्मानेंआजनष्टकेली ॥ नदिसो
भाग्याचीचशुष्कझाली ॥ ४ ॥

( इतक्यांत बभ्रुवाहन प्रवेश करितो· त्याला एकटा पाहतांच दोघी ही आकांत करून आंगावरील अलंकार काढून टाकतात· केश तोडून मुखांत व मस्तकावर मृत्तिका घालून घेतात हें पाहून बभ्रुवाहन खिन्न होऊन एके बाजूस उभा राहतो व त्या पुनः शोक करूं लागतात·

पद-

(मशींबोलूं नकोगिरीधारीयाचाल)

नाथा दावूनिमुखकमलाला ॥ मगजायें होतेंविदे
शाला ॥ ध्रु० ॥ अनिवार तुम्हिं पुरुषार्थी ॥ ज
गींगातातीजनअशीकीर्ती ॥ आजकायतीसर्व
बुडाली ॥ यशचंद्रासीकाळिमाआली ॥ गोग्रह
णींअसुनएकटेच ॥ पळविलेतकौरवनीच ॥

स्वर्गीं दैत्यवधाचियेवेळीं ॥ एकट्यानीचकेली धुमाळी ॥ तुमचासाहाकारांगोपाळा ॥ कोठेंगेला घननीळा ॥ कायभक्तवत्सलब्रिदखोटें ॥ केलेंकेसेंदेवाउफराटें ॥ प्राणप्रियाघेऊनअबलांला ॥ मगजावें० ॥ १ ॥ कुरुक्षेत्रांतयुद्धकरोनी ॥ ज्यानेंलीचमूअक्षौहिणी ॥ आजिकीर्तीसर्वत्र जोनी ॥ स्वीकारिलीतरणमेदीनी ॥ कायकीजे आतांअबलानीं ॥ झाल्याकृष्णमुखींतिहीं भुवनीं ॥ केविरवद्योतेंग्रासिलासविता ॥ यवभारें मृत्युगजनाथा ॥ आजसर्पानीघातविपत्तीचा केलातेसाचइतिहासतुमचा ॥ मक्षिकेच्यापक्षवातेंकरून ॥ केसाविझलाहोआजीदावाग्न ॥ प्रियादावुनियांस्वपदाला ॥ मगजा० ॥ २ ॥

साक्या-

मूषकभक्षीभोगेंद्रासी ॥ तशिगतआजीजाली सरितापतिसीपिप्पिलिकेनेंप्राशियलाअकाळीं ॥ १ ॥ नचराहेहेंजीवितआतां, दुःखोदधींत बुडालों ॥ येउनीस्त्रीजन्मींजगतीवरी, हतभाग्याच्याझालों ॥ २ ॥

( असें म्हणून वक्षस्थळ बडवून मुखांत मारून घेतात- ) शिव शिव हो प्राण नाथ! ( असें म्हणून आंग टाकतात- व पुनः बसून- ) प्राण नाथ? आतांहीं कृष्णमुखें जगांत कशींदाखवावीं- ईश्वरा आज निष्ठुर झालास काय? देवा, सर्वस्वीकरिं आमचा घात केलास ? त्यादीन झालेल्या अबलां-

चा त्याग करून कसे हो गेलेत - हाय हाय ! अशी अर्ध कुपांत सोडून दोरी कशी रे कापलीस - ! मृत्यो, प्राण नाथाच्या आधीं आम्हांला नेण्याचें तुला स्मरणाच झालें नाहीं काय? (जमीनीवर लोळत असतां दासी त्यांस सांवरला त-) आई धरणीं आतां तूं तरी आपल्या उदरांत जागा दे - प्राणनाथ, आतां भेट झाल्यावर एकांतीं सुखोप भोगाचे विलास करण्याच्या आमच्या आशा मृगजलवत झाल्याना ! ईश्वरा, मातेच्या उदरीं उत्पन्न झालों त्याच वेळेस मरण देतास तरी आह्मांला इतके कष्ट झाले नसते- आतां त्यास स्मित मुख सरोजांतील मधुरूपी तांबूल भक्षण करून कृत्यता मानणें लयासच गेलें- हायरे निर्दया देवा ! असें नष्ट आहेस अशी आमची पूर्वीच खात्री नव्हती- प्राणनाथ आमचा कंठ शोष झाला तरी तुह्माला आमची दया एत नाहीं हें हो काय? ईश्वरा, असें म्हणून मोह पावतात- बभ्रुवाहन त्यांस सावध करितो- )

बभ्रु०- मातुश्री तुह्मिं आतां शोक करून काय होणार आहे-

साक्या-

अपराधी मीं नाहीं आधीं, शरणाच त्याते गेलों
तूं तें दूषण देउनि लत्ता प्रहारें कुपितचि झालों
॥१॥ समरीं त्यातें क्षात्र तेज म्या दाविये लें नि-
धारीं ॥ आतां न करा शोक तुम्हीं घ्या, भूषण
वसनें सारीं ॥२॥

दोघीमा०

साक्या-

निर्लज्जा कां बोलसि आतां, नाहीं सुखवसं-
सारीं ॥ नष्टा लोटीं आह्मां लोकर ॥ नेउनि रखवादि
रांगारीं ॥१॥ जनक घातक्या वदन न दावीं ॥

आतांआम्हांलागीं ॥ ज्यास्थळींपडलेपतीतये
स्थळीं ॥ नेईआम्हांवेगीं ॥ २ ॥

बभ्रु०-आज्ञा मातुश्री चलावें! असें म्हणून त्या दोघींस रण भूमीस घेऊन जातो.

## प्रवेश ६ वा.

## स्थळ-रणभूमी.

### पात्रें

उलपी, चित्रांगी, बभ्रुवाहन, पुंडरीक, मनुष्यरूपीसर्प.



( बभ्रुवाहन सर्वांस रणांत आणून भयंकर रण दाखवित असतां पार्थाचें शिर पाहतांच दोघी आक्रांत करितात. )

चित्रां०-(पार्थाच्या शवास आलिंगन देऊन.) प्राणनाथ काय होही आपली व्यवस्था. (मोह पावते.)

उलपी-(पार्थाच्या शिरासन्निध मस्तक आपटून.) प्राणनाथ, याचंद्रा सारिख्या वदनावर आज रणांतील धूळ उडावीकाय! ईश्वरा! प्राणनाथाची.

अशी अवस्था पाहण्यापेक्षां मृत्यु कां दिलास नाहींस? आहारे काळमु
रख्यादेवा! दावासाधलास? दुष्टा, विधात्या अशी पतिची विटंबना पाहा
णाऱ्या स्त्रियांच्या देहास निर्माण करते वेळेस तुझे मतीस कांहीं भ्रांती पडून
नष्ट झाली होती काय? देवा, आतां जशी प्राण नाथाची आयुष्यरज्जू तोड
लीस तशीच या दुर्दैवी स्त्रीचीही तोडून ज्या ठिकाणीं माझ्या प्राणाची विश्रां
ती गेली आहे त्याठिकाणीं मला ने. ( मुखावर मुख ठेवून. ) जिवलगा, मला
सोडून एकटाच कारे जातोस? उभा रहा तुझ्या वांचून मला दशदिशा शू
न्य आहेत. हायरे कर्मा, या पेक्षां दुःख देण्याची तुझी सीमा नाहींसीच
झाली. मृत्यो, यमधर्मा, सर्वस्वीं दुःखांतून मला सोडविणारा आतां तूंच
आहेस? एकदांही कन्या मानून माझे प्राण ज्या ठिकाणीं प्राणनाथाची
मूर्ती चलरूपी असेल त्या ठिकाणीं नेऊन टाक.?

**चित्रांगी**— ( सावध होऊन पुनः ईश्वरा, असें म्हणून मोह पावते. )
(आणि सावध होऊन. ) प्राणनाथ उठा हो उठा, प्राणनाथ, या दासीचा
त्याग करून जाऊं नका. प्राणनाथ! उठा हो! हे मत्स्ययंत्र भेदन करून
द्रौपदीला जिंका, अहो, जा जा लवकर गुरूच्या केवारास्तव द्रुपदाला
बंधन करून आणा, प्राणनाथ? कौरवानीं गायी हरण केल्या, लवकर
रथांत बसून त्यांस सोडवा. प्राणनाथ, आज या दासीची तुम्हाला करुणा
च येत नाहीं काय!

**बभ्रु०**— ( तिच्या जवळ जाऊन. ) आई, आतां शोक करण्यांत काय
होशील? आतां मला सर्व क्षमा कर.

**चित्रां०**— ( त्याला लाथ लोटून देते. ) चांडाळा जा येथून आतां अरे
परशुरामानें मातेचा वध केला आणि तूं तर दोघांचाही वध करून कृ
तार्थ झालास, यज्ञ घातक्या, नष्टा, पतीता, रे हतभा, आज तूं सर्व कु

लाचा क्षय केलास ! हें वर्तमान हस्तनापुरास जातांच चौघे बंधू आणि द्रौपदी प्राण सोडील. कुंती सासुबाईचें दुःखतर शिखरासच पोंचेल हाय हा य! प्राणनाथ! मोहपा०

**बभ्रु०–** (मातेचा शोक पाहून दुःखित होतो.) गोपाल कृष्णा, आतां मलाउभय लोक अंतरले. माझ्या सर्व सुखाची धूळ झाली. आणि जगांत अपकीर्ति होऊन निंद्य झालों इतकी यादासावर अवकृपा कांकेलीसबरें?

**उलपी–** (स्मरल्या सारखें करून बभ्रुवाहनास.) बाळा शोक करूं नको (चित्रांगीबाई.) शोक करूं नको माझा पिता सहस्त्रवदन आहे त्या पासी शिव दत्त अमृत मणि आहे. तो हर एक प्रयत्नानें आणून पार्थ व वृषकेत जिवंत करावे. परंतु त्या ठिकाणीं भयंकर सर्प आहेत. मणि आणा वयाला प्रयास पडतील. हें अनिवार कार्य जों पर्यंत याठिकाणीं कुंती सासूबाई आल्या नाहींत तों पर्यंत झालें पाहिजे. तरच बरें.

**बभ्रु०–** (आवेशानें.) मातुश्री, मीपाताळ भुवनीं गमन करून मणि घेऊन येतों तों पर्यंत तुम्हीं यांचीं शरीरें शिरां सह वर्तमान रक्षण करावीं.

**उलपी–** बाळका, तुझ्या हातून हें काम होणार नाहीं. ते सर्प तुझा द्वेषानें प्राण घेतील. तरमी सांगतें असें कर. पुंडरिकास घेऊन ये. (बभ्रु वाहन जातो.) (वपुंडरिकास घेऊनयेतो.) पुंडरिका, पाताळीं जा आणि पित्याला माझा नमस्कार सांगून. (गळ्यांतील मगळसूत्र काढून देते.) हें माझें मंगळ सूत्र तुटलें आहे ते मणि देऊन माझेगळ्यांत बांध असा माझा निरोप सांगून मणि घेऊन ये.

(पुंडरीक आज्ञा असें म्हणून निघून जातो.)

# प्रवेश ७ वा.

## स्थळ - पाताळलोक.

## पात्रें

शेष ( सर्पाधीश. ) धृतराष्ट्र ( याचा प्रधान. ) व कित्येक सर्प.



(सर्व सर्पासह शेष कांहीं गोष्टी बोलत असतां पुंडरीक प्रवेश करितो.

**पुंडरीक** - ( नमतो. ) महाराजमी. ( वंदन करितो. )

**शेष** - कोणरे पुंडरिका काय? कल्याण असो. कां रे आलास?

**पुंडरीक** - ( मंगळ सूत्र पुढें ठेवून. ) महाराज, आपल्या कन्येनें हें कंठसूत्र देऊन असें सांगितलें आहे कीं, मला अमृत मणि देऊन सौभाग्य दान करावें.

**शेष** - अरे, अर्जुन मरण कशानें पावला?

**पुंडरी०** - महाराज, धर्मानें गोत्रज हत्यानिवारणार्थ अश्वमेधाला-

आरंभ करून पृथ्वी जिंकण्या करितां अश्व सोडिला तो मणिपुरांत आला; तेव्हां बभ्रुवाहनानें त्याला बंधन केला. आणि मातुश्री सांगण्यावरून बभ्रुवाहन त्यास शरण गेला असतां पार्थानें त्यास जारिण्यो द्भव असें दूषण देऊन लत्ताप्रहार केला. तेव्हां बभ्रुवाहनानें युद्ध करून पार्थाचा वध केला.

शेष— (दुःखोद्गारानें.) फार अनुचित गोष्ट झाली. मणि देऊन कन्येला सौभाग्यवती करावी. हा आपला धर्म आहे. (असें म्हणून मणि देऊं लागतो.)

धृतराष्ट्र— (क्रोधानें.) महाराज हात आटोपा; मणि देऊं नका. मणी दिल्यानें सर्वकुळाचें अकल्याण होईल. अमृत मणी मृत्युलोकीं गेल्यावर कदाचित विनतानंद तो हरण करून नेईल. मातंग ऋषींच्या शापें करून गरुड पाताळीं येत नाहीं परंतु त्यास मृत्यलोकीं येण्याची मोकळीक आहे. हा मणि एकवार मनुष्याच्या हातात गेल्यावर मग मनुष्य स्त्रिया सर्व सर्पांचे मस्तका वरील मणी काढून घेऊन कंठहार करतील. व आम्हांस भिकारी भीक मागण्या करितां दारोदार फिरवितील. याचा विचार करा व मणि देऊं नका

शेष— धृतराष्ट्रा, आपण जर मणी न दिला तर आपल्या वर गोपाल कृष्णाचा कोप होईल. तो महान पराक्रमी आहे. ज्याणें कालियाचें मर्दन करून कित्येक दैत्यांचा संहार केला त्याचा कोप झाला तर सर्पकुलाचें दैव प्रतिकुळ झालें असें समजा. मला तर असें वाटतें कीं; मणि देऊन कृष्णप्रीति संपादन करा.

धृत०— महाराज, पार्थावर जर इतकी कृष्णाची मर्जी आहे तर कृष्णाच त्याला प्राणदान देईल. आमचे प्राण गेले तरी चिंता नाहीं. मणी देऊं देणार नाहीं.

शेष— पुंडरीका बभ्रुवाहनास असें सांगकीं, मणि देत होतों परंतु सर्प मणि देऊं देत नाहींत.

पुंड०— आज्ञा महाराज. (निघून जातो - पडदा पडतो.)

प्रवेश ८ वा.

स्थळ - रणभूमी.

पात्रें.

बभ्रुवाहन, उलूपी, चित्रांगी, पुंडरीक (सर्प)



(उलूपी व चित्रांगी शोकमग्न बसल्या आहेत तों पुंडरीक प्रवेश करितो.)

उलूपी— पुंडरीका मणि आणलास काय?

पुंडरीक—महाराज सेषानें आपणास असें सांगितलें आहे कीं, मी मणी देतों परंतु सर्व सर्प मला प्रतिबंध करितात. यास्तव तुम्हांस कृष्ण सौभाग्य दान करील न नाही पेक्षां तुम्हीं अग्नि प्रवेश करावा.

बभ्रु०—(क्रोधानें) काय रे हा मिमणी देत नाहीं? अद्यापपर्यंत या

बभ्रुवाहनाचा पराक्रम सर्प जाणत नाहींत. आई मला आज्ञा दे मी च गेल्याशिवाय मणि येणार नाहीं.

**उलूपी**— बाळा आणखी एकवेळ जर कांहीं युक्तीनें त्यास कळविशील तर बरें होईल. तें जर न च ऐकतील तर मग तुला युद्ध करणें भाग आहे.

**बभ्रु०**— ठीक आहे. प्रथमतः शेषाला एक बाणाग्रीं पत्र पाठवितों तें वाचून मणी जर न देईल तर युद्ध करीन. (असें म्हणून एक पत्रिका लिहून ती बाणाग्रीं स्थापन करितो. व तो बाण पाताळ लोकीं पाठवून देतो.

## प्रवेश १ वा
### स्थळ-पाताळ.
### पात्रें
### शेषराजा, धृतराष्ट्र, प्रधान व इतर सर्प वगैरे.



(प्रधाना सह शेष बसला असतां अकस्मात बाण येऊन सभास्थानीं पडतो.)

**शेष**– (बाण पाहून.) सर्प हो बाण कोठून आला ?

**सर्प**– (बाणाग्रीची पत्रिका काढून पाहतात.) महाराज, हा बाण मृत्यु लोकांतून आला आहे, व बाणाग्री पत्रिका आहे. त्यांत बभ्रुवाहन असें लिहीलें कीं, मणी पाठवून द्या. नाहीं तर सर्प कुलाचा क्षय करीन.

**शेष**– सर्प हो मी प्रथम मणि देत असतां मला प्रति बंध केलात. आतां त्या बभ्रुवाहाना बरोबर युद्ध करा मूर्खो धृतराष्ट्र वंशा क्षयाचा विचार केलास काय ? आतां या विघ्नाचें नीटपणीं निवारण कर पाहूं ?

**धृतराष्ट्र**– चिंता नाहीं आम्हीं बभ्रुवाहना बरोबर युद्ध करूं (असें म्हणून सर्व सर्प युद्धाची तयारी करून विवर द्वारानें पृथ्वीवर येतात.)

## प्रवेश १० वा.

### स्थळ–हस्तनापुर.पात्रें.

### कुंती. भीम, कृष्ण, देवकी व यशोदा व.



(कुंती निद्रिस्थ असतानां एकाएकीं खडबडून उठतो वा शोक करूं लागते.) कृष्णा, कृष्णा, कृष्णा.

साकी.

हे कृष्णा यदुकुलतिलका, धांव अशा समयासी
दुःस्वप्नानें चिंता पडली, करूं मी गती तरी केसी ॥ १

भीमसेन- मातुश्री, आपण निद्रिस्थ असतां एकाएकीं जागृत होऊन शोक करितां याचें कारण काय?

कुंती- साकी.

बा भीमा या वेळीं हरिला. बाही संकट आलें ॥ दुष्टस्वप्न विलोकुनि मन हें, भ्रमित चि माझें झालें ॥ १ ॥

भीमसेन. साकी.

धांव रमेशा कमलाकांता. कौंसांतक मुरारी ॥ त्रातां पंडुसुतांचा तूं असती, कीर्ति गाजे भारी ॥ १ ॥
देवा मातेलागीं दुष्टस्वप्नें पीडित केलें ॥ त्यालागी तुजबाहीं न सें मी, धांव अशा या वेळीं ॥ २ ॥

(कृष्णा प्रवेश करितो.)

कृष्णा- भीमसेना माझें स्मरण कां केलेंस?

भीमसेन- देवा मातेनें आज कांहीं दुष्ट स्वप्न पाहिलें तेव्हां पासून ती दुःखित आहे. तिचें शांतवन कर.

कृष्णा- कुंती आत्या आपणास कोणाच्या दुःस्वप्नानें दुःखित केलें? तें सांगा?

कुंती- कृष्णा, आज मी रात्रीं असें स्वप्न पाहिलें कीं, पार्थ व वृषकेतु या उभयतांनीं अभ्यंग करून उष्टारूढ दक्षिण दिशेस गमन केलें. तेव्हां पासून

